

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




वर्ष २५ वे * एप्रिल १९६९ * मूल्य १॥ रु.

# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विलास

## श्रे य ना मा व ली

आई ... जन्मदात्रीच्या ऋणातून मुक्त होण्यासाठी केलेले दिव्य आरती हवालदार ● एडवर्ड गिब्बन थोर इतिहासतज्ज्ञाच्या जीवनपटावर दृष्टीक्षेप ... प्रा. गजानन आपटे ● अगा, जे घडलेची नाही ... ते त्यांनी केव्हांच ओळखलं होतं ... द. शि. खरात ● गोरा देवी दार उघड ... स्त्रियांना सौभाग्यवाण लुटूदे — डॉ. सरोजिनी बाबर ● घात ...कैसे समजावू या राधेला ... आशा केळकर ● धोतर कोचिंग क्लासेस येथे स्त्रियांना मज्जाव कां! ... प्रा. रमेश देगांवकर ● प्लँचेटवर माजी महामंत्री ... या जाचातून त्यांची मुक्तता कशी होईल! राजाराम हुमणे ● होळी रे होळी मुक्त स्वातंत्र्याचा सण वसंत देशमुख

**✻ एकमेकांच्या नावाने बोम्बाबोम्ब ✻**

**मासिक विंगचित्रमाला**

आणि आमचेही (एक) मत ● ऐसी अक्षरे रसिके ● पानपुरी ● इंद्रधनुष्य ● रंगमंच ● दीपमाला ही नेहेमींची खुसखुशीत सदरे याशिवाय

**✻ कुटुंब नियोजन खास पुरवणी ✻**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART




संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay-4.









**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# मंथन–

गति-प्रगतीच्या प्रक्रियेत मंथनाला फार महत्वाचे स्थान आहे. त्याला नावे निरनिराळी असतील. पण असली विविध नावे घेतलेले मंथन मात्र युगामागून युगे चालतच आले आहे. मंथनातून क्वचित अमृत गवसते तर कधी विषही ! कधी रत्ने सापडतात तर कधी क्षुद्र वस्तूही ढवळून वर येतात. पण समाजाची, व्यक्तीची, व्यक्तिसमूहाची प्रकृति निकोप राखण्यासाठी अधुनमधून असली मंथने आवश्यक असतात. उपकारक ठरतात ..'वादे वादे जायते तत्वबोधः' ह्या न्यायाने प्रत्येक मंथन काही 'तत्वबोध' करून जात असते, हा तत्वबोध ध्यानी घेऊन जी माणसे पुढील दिशा ठरवतात वा धैर्याने वाटचाल करतात, त्यानाच काही 'अर्थ' गवसतो. त्यांचीच कामे पार पडतात व 'मोक्ष' मग फारसा दूर रहात नाही. जे व्यक्तीचे तेच जन समूहाचे – राष्ट्राचेही !

गेल्याच महिन्यात मुंबईत प्रचंड प्रक्षोभ झाला. आता त्याची उत्तरक्रिया चालू झालेली आहे. ह्या क्रियेत मंथनाला फार महत्वाचे स्थान आहे. अनेक राजकीय, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रातील माणसे पुढे सरसावून आपापले विचार मांडीत आहेत. ह्या निमित्ताने भाषावार प्रांतरचनेबाबतही पुन्हा एकदा नवे चिंतन मांडले जात आहे. अभिनिवेश सोडून, शांत मनाने भाषिक राज्याचा जमाखर्च मांडून, राष्ट्रीय एकात्मतेच्या वेदीवर आजवर दिलेल्या बळींचा आणि वेचलेल्या मालमत्तेचा हिशोब मांडला जात आहे. द्वेषही शिकवला जात आहे तर विद्वेषी भूमिकेचे आवाहनही केले जात आहे. हिंसक उद्रेक तर मद्रासपासून कलकत्त्यापर्यंत आणि काश्मीरपासून अहमदाबादपर्यंत सतत होत आले आहेत. विद्यार्थी जगतही त्यातून वाचलेले नाही. पण चार जणांना डांबून वा गटशः माणसांना तुरुंगात डांबून, एखाद्या सेनाप्रमुखाला चार शिव्या हासडून वा असल्या सेनांना बंदी घालून मूलभूत समस्या काही सुटत नाहीत, सुटणार नाहीत. शासनाला काही सिद्धांत असावे लागतात. त्या सिद्धांतांमागे पडेल ती किंमत देऊन उभे राहणारा ताठ कणा लागतो. सौदेबाजीचीच चटक लागलेल्या शासनाला सौदाही साधत नाही आणि राष्ट्रीय एकात्मतेचा महान प्रयोगही साधत नाही. लोकशाही राजवटीत लोकशाहीने दिलेले कौल मानण्याचे मनाचे मोठेपण असावे लागते. आणि ते मानताना मन कितीही कठोर करावे लागले तरी ते करण्याची सिद्धताही करावी लागते. शासनच बोटचेपे, फाजील सौदेबाज झाले तर राष्ट्राला सिद्धांतच उरणार नाहीत आणि असले कणाशून्य शासन हे पुरुषार्थ जागवू शकणार नाही. सीमाप्रश्न हा काही एका पक्षाच्या इच्छेचा वा प्रतिष्ठेचा प्रश्न नाही. काही लाख भारतीय नागरिकांच्या लोकशाही निष्ठा त्यात कसोटीला लागल्या आहेत. 'सर्दी झालीय्' 'प्रकृती बरी नाही', असली फालतु कारणे पुढे करून केला जाणारा कालहरणाचा घोळ हे काही मुंबईच्या दंगलींना शांततामय – शासकीय उत्तर खासच नव्हे. मंथन जरूर व्हावे. विषावर उतारा जरूर सांगितला जावा. पापी माणसांना प्रायश्चित्तही दिले जावे – पण नुसत्या वांझोट्या आश्वासनांनी आणि "वाटाघाटी करा" ह्या आदेशाने दळण दळीत मूळ प्रश्नांची उकल होणार नाही हे ह्या 'मंथन'वाद्यांनी निश्चित लक्षात घ्यावे. लोकशाहीचे कौल डावलून 'सागरी प्रांतां'चे नवे ढोल डिंडीम पिटले गेले तरीही मूळ मागणीचा सूर मूक होईल ही आशाही लोकशाही निष्ठेचे नगारे पिटणारांनी मनात बाळगू नये. 'आग सोमेश्वरी, बंब रामेश्वरी' वा रोग हृदयाला आणि मलमपट्ट्या पोटरीला असल्या उपाययोजना फारशा उपकारक ठरणार नाहीत. कारण वेदना माणसांची आहे. कौल माणसांचा आहे. क्षोभ माणसांचा आहे. झालेले मृत्यू मानवी आहेत. हानीही मानवी आहे आणि म्हणूनच मंथनातून माणसाचे मंगल घडेल असाच कौल शासनाने दिला पाहिजे. काही चुकींच्या व राष्ट्राची भूमी गमावणाऱ्या निर्णयांच्या पाठीशी जे शासन ताठ कण्याने उभे राहू शकते त्याच शासनाला सीमाप्रश्नाबाबत मात्र 'कणा'च लाभू शकत नाही हे काहीसे शोचनीय आहे. चिंत्य आहे. दंगलीतून मंथन सुरू झाले आहे. मंथनातून मंगल घडेल व सौदेबाजीच्या शापाने डागळलेली भारतीय लोकशाही धवलकीर्त होऊन बाहेर पडेल अशी आशा करूया.

— संपादक

अनुक्रमणिका








### अंतर्मनाला आवाहन

स. न. वि. वि.

प्रतिमासी 'दीपावली'चा अंक वाचताना एखादा लेख, परीक्षण परिचय, विग्चित किंवा इतर काही मजकुराने माझ्या अंतर्मनाला आवाहन (टच) केले नाही असे क्वचितच घडले. हे 'दीपावली'कारांना पत्रभेटीत केव्हातरी कळवायचेच असे ठरविले होते, म्हणून हे पत्र.

'दीपावली'तील मला आवडलेल्या मजकुराची मी कात्रणे ठेवली आहेत. 'दीपावली'चे अंक ओतप्रोत उत्साहाने, हौशीने, जबाबदारीने व अनेकांच्या सहकार्याने काढल्याचे जाणवते. गेली दोन तपें हा क्रम अविरत चालू आहे हे आपणांस निःसंशय भूषणावह आहे. नाटय, संगीत, चलच्चित्र, सेनादले, साहित्य, शास्त्र, कला, क्रीडा इत्यादि जवळजवळ सर्व विषयांवर आकर्षक आणि माहितीपूर्ण मजकूर येतो, त्यामुळे वाचकांची पुढील अंकाकडे दृष्टी लागून राहाते. मासिकांच्या इतिहासात हा एक विक्रमच म्हणावा लागेल. 'दीपावली'-तील प्रारंभीच्या 'संपादकीयां'चाही मुद्दाम उल्लेख केला पाहिजे.

'दीपावली' अधिकाधिक प्रकाशमयी होवो !

विलेपार्ले (पूर्व) आपला

मुंबई-५७ **नारायण रामचंद्र करंदीकर**

### कोकणी जीवनपट

स. न. वि. वि.

'दीपावली'चा अंक हाती पडल्याबरोबर 'परशुरामची सावली' कादंबरीचा तिसरा भाग प्रथम वाचला. कादंबरीचे पहिले दोन भाग वाचून तिसऱ्या भागाबद्दल अत्यंत उत्सुकता वाटत होती. पहिले दोन भाग वाचल्यावर कादंबरीचा शेवट कसा होणार याचे काही आडाखे मी मनाशी बांधले होते, पण माझ्या कल्पनेपक्षा लेखकाने कादंबरीचा शेवट वेगळयाच प्रकारे केला आहे आणि तोही मी ठरविलेल्या शेवटापेक्षा अधिक चांगला आणि वास्तववादी आहे हे मी प्रांजलपणे कबूल करतो.



श्री. रवींद्र पिंगे यांची ही कादंबरी मला खूपच आवडली. या कादंबरीतून लेखकाने कोकणचा जीवनपटच वाचकांसमोर उभा केला आहे. श्री. श्री. ना. पेंडसे यांनी आपल्या कादंबऱ्यांमधून कोकणची पार्श्वभूमी यथातथ्य रंगविली आहे. श्री. पिंगे यांनी त्यांचे अनुकरण केले नसताही त्यांच्या कादंबरीतून कोकणची पार्श्वभूमी समर्थपणे आपल्यासमोर उभी राहाते. कादंबरीतील पात्रांचे चरित्रचित्रणही उत्तम झाले आहे.

(पृष्ठ ६१ वर पहा)












**.... आणि मग बांध फोडून हमसाहमशी रडणाऱ्या**
**आईला मांडीवर घेऊन ती शांतपणे**
**थोपटत राहिली ती आईची**
**आई झाली होती**

**–सौ आरती हवालदार**

पिक्चर पहाण्यात तीन तास कसे संपले तेच कळलं नाही. थिएटरमधून बाहेर पडल्यानंतर ती दोघं कोपऱ्यावर आली. तो तिच्याकडे पाहून थांवला. अगदी हळुवार आवाजात म्हणाला, "घरापर्यंत पोचवायला हवं का? जाशील ना एकटी नीट?"

"इश्श, न जायला काय झालं? मी काय कुक्कुलं बाळ आहे? तू तरी भारीच, इथ्थे तर चार पावलांवर घर आहे."

"आपल्या माणसाला जपावसं वाटतं खूप. तळहातावरच्या फुलासारखं."

तिला एकदम गहिवरून येतं हे त्याचे शब्द ऐकून. तिला आपलं म्हणणारं, जपणारं, जाणणारं फक्त हे एकच माणूस. त्याच्या दृष्टीतून, त्याच्या स्पर्शातून, शब्दातून आणि निःशब्दातूनही झिरपणारा तो आपलेपणा – त्या आपलेपणानं तिच्या मनात कृतज्ञता काठोकाठ भरून येते. पिक्चर पहाताना एखादा कमालीचा नाजुक क्षण पडद्यावर दिसला, की त्याच्या हातातून त्या क्षणाची सारी थरथर तिच्या वोटात उतरत होती, तिथून काळजापर्यंत जाऊन पोचत होती. त्याच्या त्या स्पर्शाची कोवळिक काही विलक्षण होती. अंगांगी मोहरून यावं नुसत्या तिच्या आठवणीनं अशी.

ती कोवळिक मनात जपत जपत ती घराकडे जाते. पावले हलकी पडताहेत.

पण घराच्या आवारात शिरते तोच आईवडिलांची हमरीतुमरी ऐकू येते. कान जाळत जाते. थोडच्या वेळापूर्वीची कोवळिक पार वटून जाते.

रोज हे अस्सं चालतं! वडिलांच्या शब्दांचा खणखणाट, शिव्यांचा भडिमार, आईचं रुसणं, आदळआपट, मग रडणं, उसासे आणि अखर हतवलता – कमालीचा थकवा, वैराग्य – "आई, असंच का ग तुझं आयुष्य जायचं? कुठलं गेल्या जन्मीचं पाप फेडते आहेस?"

ती दाराशीच परत वळते. मागल्या दारी जाते. अंगणातल्या आंब्याच्या पारावर बसून राहते. "चालू दे चाललंय ते. वादळ शमेपर्यंत बसावं इथंच. ह्या आंब्याचा केवढा आधार आहे कल्पनातीत. गेली दहा वर्षं पाहिज त्या क्षणी ह्या आंब्यानं जवळ येरू दिलं आहे. खूप समंजस आहे तो. सांगितलेलं सारं निमूटपणे ऐकून घेतो. समजून घेतो. मनातल्या विचारांचा कल्लोळ हलके हलके ओसरवतो आणि एखादा हलकासा पण मोलाचा सल्ला देतो."

जडावून ती आंब्याशी वसून रहाते. रात्रीचे नऊ वाजून गेलेत. मागल्या अंगणात तसा अंधारच आहे. मघाशी त्याच्या सहवासात तिच्या अंतरंगात फुललेल्या साऱ्या ज्योतीही परिस्थितीच्या भयाण जाणिवेनं विझूविझू झाल्या आहेत. आसपासच्या भागातल्या दिव्यांचा मिणमिणता उजेड इथल्या अंधाराला हटवायचा केविलवाणा प्रयत्न करतोय. आणि तीदेखील डोळे फाडफाडून काळोखात बुडू पहाणाऱ्या वस्तूंना आकार आणू बघतेय. अधूनमधून तारस्वरात उच्चारलेली आईची वाक्यं-ह्या वातावरणाला छेदत जातात.

"पण तुम्ही जा ना तुम्हाला कुठं जायचं तिथं? – मीं कुठं तुम्हाला अडवतीय! कुठं जायचं तिकडे जा मसणात. काही का शेण खा ना. मी कुठं नाही म्हणते? – पण माझ्या अंगात म्हणाल तर आता अगदी त्राण नाही. माझ्याकडून काही मागू नका. पाया पडते तुमच्या. माझं अगदी चिपाड झालं आहे हो. मी नाही तुमच्या भुकेला पुरी पडणार. –

जा कुठं जायचंय तिकडे. पण मला नका आता सतावू. फार झालं!"

आई हे सगळं बोलते आहे. मधूनमधून आवंढे गिळीत, थकत, रडत, थांबत, आणि पुन्हा रडत आई हे सगळं बोलतेय.

आंब्याच्या पारावर बसून ती आजुबाजूला चोरटी नजर टाकते. शेजार-पाजारच्या घराना खडबडून जाग आलीय. कान टवकारून सगळी घरं तिच्या आईचा शब्द न् शब्द टिपून घेताहेत. चवीनं त्या शब्दांचा रवंथ करताहेत. काल करूनही पुन्हा आज नव्या उत्साहानं करताहेत. त्यावर उपहासाची, कुचेष्टेची सुपारी चघळताहेत. शरमेची एक प्रचंड लाट तिला घेरून टाकते. दोन्ही पाय गुडघ्यात वाकवून ती अंगाची जुडी त्यावर लपेटते आणि गुडघ्यात मान खुपसून बसून रहाते. कान, ओठ, डोळे सगळं मिटून घेऊन. पण भोवतालच्या घरांच्या [illegible] चरबट आवाज वाढत

अनुक्रमणिका

वाढत जाऊन तिच्या मिटल्या कानांचे पडदे फोडून आत घुसतो. मेंदूत शिरून त्याचे वाभाडे काढतो आणि मग उलटा वळून तिचं काळीज रक्तबंबाळ करून सोडतो.

आई ! कोणे एके काळी थोडीफार गाजलेली नटी. नृत्य, संगीत असल्या साऱ्या गोष्टींची जात्या-आवड असणारी. जोडीला सुडौल बांधा, केतकी गोरा रंग, गहिरे बदामी डोळे आणि पाहिल्यावर पहातच रहावेत असे धुंद, सोनभुरे, कुरळे केस पाठीवर रुळणारे. आज ह्या साऱ्या सौंदर्याचे उरलेत ते फक्त भग्नावशेष. पण त्या अवशेषातूनही पूर्वीची आई लपत नाहीच. तिचं जुनं वैभव विसरता येत नाहीच. तिच्या उन्मादक सौंदर्यानंच तिचा घात केला. नटी होण्यापूर्वीच घरच्या माणसानी एका सामान्य शाळामास्तराशी लग्न लावून दिलं होतं. अगदी रुक्ष, गद्य, बेकंबेवाला माणूस. हिचा सारा नखरा त्याच्यापुढे पार उतरून जायचा. कारण त्याला काही उमगतच नव्हतं. लग्न म्हटल्यावर सगळं आलंच म्हणून केवळ इमानेइतबारे रात्री हिला जवळ करायचा आणि काम संपताच घोरायला लागायचा. आईची तडफड तडफड व्हायची. बाहेर साऱ्यांचे मुजरे मिळायचे आणि घरात बघावं तर हे असं. इथं बहरला होता वसंत, पण तिच्या जोडीदाराची संवेदनाच बधिरलेली. उरली होती फक्त जीवघेणी तडफड. आणि अरसिकतेपोटी उद्‌भवलेली निर्घृण उपेक्षा. मन मुकं होतं बराच काळ, पण शरीर अगतिक होतं. व्यवहारानुसार व्हायचं ते होतच होतं. त्यातूनच एक दिवस एक कमनशिब जन्माला आलं !

आंब्याच्या पारावर बसून होतं आत्ता ते. घरातलं तुंबळ युद्ध संपण्याची वाट पहात

अखेर ती उठून घरात गेली. रडून डोळे सुजलेल्या आईनंच दार उघडलं. आईची नजर टाळून ती सरळ आतल्या खोलीत गेली. आईनं साडीच्या पदराच्या बोळचानं हुंदका परत घशात लोटला हे आपल्याला समजलंच नाही असं तिनं स्वतःला बजावलं. ज्या गृहस्थाशी आई भांडत होती तो हिचा दुसरा बाप. दुसरा म्हणण्यापेक्षा तिसरा, कारण पहिल्या वडिलांशी काडीमोड घेतल्यानंतर मध्यंतरी सातआठ वर्षं आई एका बड्या आसामीपाशी लग्न न करता लग्नाची असल्यागत राहिली होती. हिच्यावर थोडंफार प्रेम केलं ते त्या माणसानं. हिला आणि तिच्या आईला दोघीना तो लहान मुलीं-सारखं वागवायचा. त्यांच्या सगळ्या हौशी, आवडीनिवडी पुरवायचा. साठीच्या घरातला होता तो. मर्द गडी होता एकदम. वाघ. मोठा रुबाबदार दिसायचा. हिला वाटायचं वडील असावेत तर असे.

आणि मग एक दिवस कुठल्याशा सिनेमाकंपनीत आईला हा आत्ताचा माणूस भेटला. कोवळा होता अगदी. नुक्ती मिसरुडं फुटलेला. आणि आई उतरणीला लागलेली. भविष्याच्या कल्पनेनं क्षणोक्षणी घाबरणारी. असुरक्षिततेच्या भावनेनं सतत बावरलेली, हरवलेली. पण तिच्या रूपानं हा नादावला. कमालीचा वेडा झाला. वयानं वडील असणाऱ्या या बाईच्या मागे लागलागून त्यानं तिच्याशी लग्न केलं. तिच्या स्वप्नांना फुलवलं. पहिली चार पाच वर्षं तिला खूप जपलं. आणि मग हळुहळू आकर्षण संपलं. तिचं शरीर त्याच्या आता परिचयाचं झालं होतं. त्याला कंटाळा आला होता तिचा. रोजरोज तोच अनुभव घेऊन वीट आला होता त्याला. रोज कसली



ना कसली कुरबूर सुरू झाली. घरातलं त्याचं लक्ष उडत चाललं. इतर पुरुषांशी तिचं बोलणंवसणं त्याला आता रुचेना. आणि हे सगळं कळल्यामुळेच की काय, पण आई कोरडी होत होती दिवसेंदिवस. उदासीन होत होती. पार रिती होत होती. स्वतःवरच्या त्याच्या अविश्वासानं दुखावत होती. कळवळत होती. नवऱ्याला सर्व प्रकारचं स्वातंत्र्य देण्याचा मोठेपणा तिनं दाखवला होता. पण क्षणाक्षणाला त्यानं तिच्या वागणुकीबद्दल घेतलेल्या संशयाचा क्षुद्रपणा तिला वैताग आणीत होता. तिचे तर सगळेच पत्ते उघडे होते. ते ठाऊक असून त्यानं तिला पत्करलं होतं. असं असताना आता तिच्याकडून एखाद्या पतिव्रतेची अपेक्षा तो करत होता. त्याच्या अपेक्षेला पुरं पडायची जिवापाड धडपड तीही करत होती. पण कावीळ झालेल्या त्याच्या डोळ्यांना सारं जग पिवळं दिसावं ह्या दुर्दैवाला तिचा तरी काय इलाज होता? ती फक्त त्याच्या संशयाचा एक एक आसूड पाठीवर घेऊन कळवळत होती. एकदा तिचं नाव कानफाटी पडलं; आता सुटका नाही. जगाच्या कलुषित नजरेचं प्रतिनिधित्वच जणु तिचा नवरा करीत होता. आणि जगाची तिच्याबद्दलची धगधगती नजर तिच्या निरपराध पोरीला पण झाळायला कमी करणार नाही या कल्पनेनं ती अधिकाधिक सुकत होती. नवरा हलक्या कानाचा होता; एवढंच नव्हे तर त्याच्या कामुकतेला धरबंधच राहिला नव्हता. बायकोचा संशय घेणारा तो माणूस स्वतः मात्र नवनवे उंबरठे शोधीत होता. म्हातारी बायको केल्याचा पश्चात्ताप होऊन रोज उरस्फोट करीत होता. आणि स्वतःवरच्या अन्यायाचं एकमेव परिमार्जन म्हणून तिच्याकडून स्वैराचाराला मोकळिक मागत होता. तेही तिनं केलं; त्याला मोकळिक दिली. पण अलिकडे ह्या सगळ्या प्रकारानं एक नवीच धडकी तिच्या मनात भरत होती. आणि त्या कल्पनेनं तिच्या सर्वांगाला कापरं सुटत होतं. काळीज धडधडत होतं. पोरीकडे पहायची ती. ते कोवळं, निरागस तारुण्य पहायची आणि मनोमन 'इडा पिडा टळो' म्हणून बोटं मोडायची. "ह्या माझ्या सोनसाखळीला दृष्ट न लागो देवा, अशीच सुस्वरुप राहू दे बाळीला," असं दिवसाकाठी दहांदा आळवायची ती. नशिबावर विसंबून राहिली होती विचारी.

बिहारची 'बॉंब'




आईचे सारे हाल मुलीला कळत होते. आई नुसती भीत होती; पण मुलीनं तर भविष्याची सारी चाहूल केव्हाच घेतली होती. एक ना एक दिवस कसला तरी भयंकर प्रकार घडणार आहे हे ती जाणून होती.

आंघोळ करताना खिडकीतून कुणाचेसे डोळे सर्वांगावर फिरत असलेले एकदा तिला दिसले होते. आणि धरणी दुभंगेल तरच निभाव आहे असं तिला होऊन गेले होते. रात्री अपरात्री कुणाचे तरी गरम उच्छ्वास् तोंडाशी भासल्यामुळे ती अनेक मरणं मेली होती. नुसत्या या असल्या भासांमुळे, कल्पनेमुळे तिची कित्येक रात्री झोप उडाली होती. रात्री किती वेळ डोळे टक्क उघडे ठेवून ती जागायची. काळोख भयाण असायचा, घड्याळाची टिकटिक हजारपट मोठी ऐकू यायची. कुठे खुस झालं तरी जीव ठाव सोडायचा. वेळ संपता संपायचाच नाही. प्रार्थनेला हात जोडावेत पण प्रार्थनाच ओठात अडावी असं व्हायचं.

आत्तासुद्धा मनाला आवर घालायचा आटोकाट प्रयत्न करत होती ती. गच्चीत तिनं अंथरूण टाकलं. आईवडिलांच्या खोलीची व्यवस्था पाहून पाण्याचा तांब्या उशाशी घेऊन ती पलंगावर पडली. आकाशातल्या चांदण्या मोजत राहिली. मघाशी पाहिलेल्या चित्र-पटातले प्रसंग अधूनमधून डोळ्यापुढे तरळत होते. मधूनच त्याचा हळवा स्पर्श जाणवत होता. मधूनच आईचे उसासे आठवून अंग शहारत होतं. आणि ह्या सगळ्या पाठोपाठ मग एक अनामिक भीती अंग भेदून जात होती आरपार. असा बराच वेळ गेला. हळुहळु गच्चीत पुष्कळच गारवा पडला.

त्याच्या प्रश्नाला आणखी एका दिवसानंतर तिला उत्तर द्यायचं होते. आजवर कधी तो बोलला नव्हता. पण आज सिनेमाला जाण्यापूर्वी हॉटेलमध्ये कॉफी घेताना त्यानं कमालीच्या भारलेल्या आवाजात तिला विचारलं होतं, "तू माझी होशील? नाही म्हणू नकोस. मला अपार दुःख होईल. तू मला जिवापलिकडे हवी आहेस; खरंच."

यावर तिनं फक्त त्याचा आवेगानं हात दाबला होता. पण डोळ्यांनी तिनं त्याला विचारलं होतं, "तुला ठाऊक आहे ना सारं? तू कधी आजवर विचारलं नाहीस त्याबद्दल हा तुझा चांगुलपणा. पण माहीत असेलच तुला सारं. माझ्या साऱ्या खटल्यात तुला कसं ओढू सांग? फार चांगला आहेस तू. तुझ्या या गोडव्यानं, प्रेमानं मी कृतार्थ झालेय. तेवढ्या एका धाग्यावर संकटाचे अनेक डोंगर तरून जाईन बघ. पण तुला सांगू? तुला माझ्यापेक्षा कितीतरी चांगली जोडीदारीण मिळेल. माझ्या आईशी मी नाळेनं बांधली गेलेय हे कसं विसरतोस? आणि मी तरी कशी विसरू? कशी डावलू? सगळं जगही ही गोष्ट कधीच विसरणार नाही!"

तिच्या डोळ्यातले हे अनंत भाव जाणूनही त्यानं पुन्हा तिला एकवार सांगितलं होतं, "तू हो म्हण. फक्त हो म्हण."

यावर ती म्हणाली होती, "मला थोडा वेळ दे. फक्त चोवीस तास."

"वेळ हवा तेवढा घे. पण उत्तर मात्र नको ते देऊ नकोस."





असं म्हणून तो खूप मृदु डोळ्यांनी तिच्याकडे पाहून हसला होता. केवढा दिलासा होता त्या हसण्यात !

तो दिलासा छातीशी धरून ती झोपली. झोपेतसुद्धा ती स्वतः-शीच किंचितसं हसत होती. त्यानं तिचा हात फक्त हातातं घेतला होता. याहून अधिक काही करणं म्हणजे विनयभंग करणं अशी त्याची समजूत असावी. "लग्न झाल्यावरदेखील असंच वागेल वेडा " असा विचार पिक्चर पहाताना तिच्या मनात आला होता. झोपेतही त्याच विचारानं तिला हसू फुटत असावं.

मध्येच झोपेत तिनं कुशी पालटली. अंगाला शिरशिरणाऱ्या गारव्यानं तिनं पाय जवळ घेतले. मऊ पांघरूण अंगावर जरासं वर ओढलं. आणि उजवा हात मात्र पांघरूणाच्या वरच ठेवून ती पुन्हा विसावली.... अर्धवट झोप, अर्धवट जाग, त्यात पडलेलं स्वप्नाचं बीज. स्वप्नाला पालवी फुटली. त्यातून फुलं फुलली. त्याचा हस्तस्पर्श तिच्या दंडाला झाला. त्याचे ऊष्ण ओठ उजव्या उघडया हातावर वरून खाली पिसासारखे हलके फिरत गेले. मग बोटांची चाळवा-चाळव झाली. तिचा हात त्यानं आपल्या हातात घेतला. तिची नाजुक बोटं कुरवाळली. आणि मग तो वुजऱ्या स्वरात कुजबुजला, "तू माझी होशील ?"

माझी, माझी, माझी, माझी उत्कट, हळव्या स्वरात शब्द पुन्हा पुन्हा उमटत राहिले. हेलकावत राहिले. त्या शब्दांच्या तरंगांची कितीएक वलयं उठली. अर्थाचा विस्तार वाढत वाढत गेला. आणि.. आणि..

पण हे सगळं किती, क्षणभरच ! आणि दुसऱ्याच क्षणी खऱ्या हाताला होत असलेल्या खऱ्या, ओलसर स्पर्शानं ती खाडकन् जागी झाली. ह्या घाणेरडया स्पर्शानं अंगाला साक्षात् चटके बसत होते. हा स्पर्श स्वप्नातल्या राजकुमाराचा नव्हताच. हा होता मूर्तिमंत नरक ! तिचा तिसरा बाप जवरीनं काहीतरी तिच्याकडून घेण्याच्या तयारीनं आला होता. त्याच्या त्या राक्षसी इच्छेची जाणीव झाल्या-क्षणी तिला खडबडून जाग आली. एकाएकी ती उठून बसली. तिनं त्या हाताकडे एकवार डोळे फाडून पाहिलं, आणि एखादं भयानक, क्रूर, अतिमानवी दृश्य पहावं त्याप्रमाणे ती जिवाच्या आकांतानं किंचाळली. आजवर तिला वाटणारी अनामिक भीती, ह्या क्षणाची चाहूल आत्ता एकदम आकार घेऊन तिच्यापुढे उभी राहिली. तिचा रंग काळोखाचा होता. आणि आकार निराकाराचा होता. रूप विद्रुप होतं तिचं. आणि ती काळोखी, निराकार, विद्रुप भीती खदखदा हसत तिच्या बापाच्या रूपानं तिला झटत होती.

त्या ओरडण्यानं जागी होऊन आई तीरासारखी धावत आली. नवरा नामक त्या तिरस्करणीय प्राण्याला धरून तिनं मागे खेचलं आणि बेभानपणे ती त्याला थोबाडत राहिली. हात दुखायला लागले तशी मग तिनं तोंडाचा पट्टा सुरू केला. विलक्षण आवेशानं ती त्याला बोलत राहिली.... नवरा त्या पापी कल्पनेनं ओशाळला होता. आणि ती बडबडतच होती.. वेडयासारखी.

मुलगी हताशपणे बसली होती. अंगातली सारी शक्ती हरवून विकल बनली होती.

आणि मग एक आश्चर्य घडलं. त्या बाईच्या त्या अखंड बड-बडण्यानं एकदम नवरा संतापला; त्याच्यातला पुरुषी अहंकार एकाएकी फणा काढून उभा राहिला. रागानं उसळून गदगदत तो तिला म्हणाला, "हे बघ, तुझ्यासारख्या कमअस्सल, बेइज्जत बाईशी लग्न केलं आणि जिवाला नसता घोर लावून घेतला. इतका वेळ तुझा चरवटपणा ऐकून घेतला. हेच फार झालं. एकदम थोबाड बंद कर तुझं. समजलीस ? आणि मी काय सांगतो ते नीट ऐक. ही तुझी पोर – तुझीच अवलाद आहे – उगीच मानभावीपणानं आरडा-ओरडा केलान्. पण तिची चालचलणूक मला ठाऊक आहे. यापुढे तुझी म्हातारी हाडं चघळत बसायला मला वेळ नाही. तुला रहायचं असेल इथं, पोटाला खायला हवं असेल, माझं नाव लावायला हवं असेल तर तुझी जागा हिनं घ्यायला हवी. समजलं ? रोज रात्री मी मागेन ते मला तिनं द्यायला हवं. तुझा बिछाना आता माझ्या खोलीच्या उंबऱ्यावाहेर, समजलीस ? उद्या सकाळपर्यंत तुमचं दोघींचं उत्तर मला कळायला हवं." हे अभद्र शब्द उच्चारून तो ताडताड पलिकडच्या खोलीत निघून गेला.

आई क्षणभर अवाक् होती. मग हळुहळू भानावर आली. स्वतःला तिनं सावरलं. खालचा ओठ दाताखाली गच्च दाबून धरला. मग तिनं आपल्या त्या सोनसांखळीकडे डोळे भरून पाहिलं आणि अपार करुणेनं द्रवून तिच्या केसांवरून हात फिरवला. घशात साचून फुटू बघणारा हुंदका पुन्हा गळयात लोटत ती एक एक शब्द बोलू लागली, "जा पोरी तू, इथून निघून जा, कुठंही जा, पण यापुढे या नरकाची धन करू नकोस. खरंच सांगते....."

आईच्या या सांगण्यावर तिचा विश्वास बसेना. तो स्वार्थत्याग, ते धैर्य, त्या शब्दातलं प्रेम आणि चांगुलपण आणि त्या अनुज्ञेमागचा भीषण अर्थ सारंच तिला उमगलं. आणि एका क्षणात ती अनेक वर्षांनी मोठी बनली. आईला म्हणाली, "आई, तू खूप सोसलंस आजवर. ह्या वयात आता तुला एकटी टाकून कुठं जाऊ ? तुझी नाळ मला तोडायची नाही. भावडी आहेस. तू असहाय्य आहेस. मी इथेच राहीन. बर का ? माझा स्वतंत्र विचारच या पुढे करू नकोस."

आणि मग बांध फोडून रडणाऱ्या आईला मांडीवर घेऊन ती शांतपणे थोपटत राहिली......

• • •

## 'होळी'वर पोळी !

या राष्ट्रघातक्याचा बंदोबस्त करा!
मुंबईत, केंद्रिय पोलिस ठेवा!!



— ज्ञानेश्वर नाडकर्णी

## दोघा साहित्यिकांची चित्र-प्रदर्शने

गेल्या काही आठवड्यात भारतातल्या काही आघाडीच्या चित्रकारांच्या कलाकृतींची प्रदर्शने पाहायला मिळाली. विशेष म्हणजे यांच्यापैकी दोन चित्रकार हे साहित्यिकही आहेत!

रामकुमार यांचे वास्तव्य दिल्लीला असते. पॅरिसमध्ये शिक्षणानिमित्त गेल्यावेळी फर्नान्द लेजेसारख्या जागतिक ख्यातीच्या चित्रकाराची संथा घेण्याचे भाग्य त्याना लाभलेले आहे. पॅरिसमध्ये दीर्घकाल शिक्षण घेण्यासाठी जे चित्रकार जातात त्यांच्या शैलीत जे स्थित्यंतर होते ते राझा, लक्ष्मण पै, रामकुमार यांच्यासारख्या प्रतिभावंत कलावंतांच्या बाबतीत अभ्यास करण्याजोगे असते. राझा यांचेच उदाहरण घ्यायचे म्हटले तर भारत सोडण्यापूर्वी वॉल्टर लॅन्गहॅमर यांच्या प्रभावाखाली असलेली त्यांची निसर्गचित्रण शैली आणि गेल्या वर्षी केमोल्ड गॅलरीतील प्रदर्शनात लावलेल्या त्यांच्या निसर्गचित्रांच्या 'अॅब्स्ट्रॅक्ट' प्रेरणा यांच्यात जमीन-अस्मानाचा फरक दिसून आला.

रामकुमार यांच्या चित्रांचे प्रदर्शनही केमोल्डमध्येच भरलेले होते. त्याच वेळी ललितकला अकादमीने त्यांच्याबद्दलचे ते सचित्र पुस्तक प्रसिद्ध केलेले आहे त्याचेही प्रकाशन झाले. या पुस्तकात त्यांच्या गेल्या १५–२० वर्षांतील प्रातिनिधिक चित्रकृतींचे दर्शन घडते, आणि या काळात त्यांच्या शैलीत कसकसे स्थित्यंतर होत गेलेले आहे ते लक्षात येते. पॅरिसहून आल्यावरसुद्धा रामकुमार दारिद्र्याने गांजलेल्या भुकेकंगालांचे वेदनेने आक्रसलेले चेहरे रंगवीत होते. एका वेगळ्या शैलीत या चेहऱ्यांचे आरेखन करीत असताना त्यांच्यावर मॉदिग्लिआनीच्या व्यक्तिचित्रणशैलीचा प्रभाव पडल्याचे दिसून येत होते.

हळूहळू रामकुमारांनी वास्तव दृश्यांचे चित्रण करायचे थांबविले, आणि एका वेगळ्याच प्रकारच्या निसर्गचित्रणाकडे ते वळले. झाडाझुडपांसारख्या सांकेतिक सौंदर्याने नटलेल्या विषयाऐवजी ते गर्दीच्या शहरांचे, त्यांतील रस्त्यात दाटीवाटीने उभ्या राहिलेल्या घरांचे, अंतराळातून दिसणाऱ्या छपरांचे देखावे एक प्रकारच्या भूमितीनिष्ठ शैलीत रंगवू लागले. या चित्रणात रंगांचा भडकपणा दिसणार नाही, दोन चार मोजक्या रंगांच्या विविध छटांच्या द्वारेच परिणाम साधेल याची ते काळजी घेऊ लागले.

परवाच्या त्यांच्या प्रदर्शनात ते याहीपलीकडे एक पायरी गेलेले आहेत असे दिसून आले. आता त्यांच्या चित्रात विशिष्ट तपशील ओळखता येत नाही; त्यामुळे चित्राची प्रेरणा निसर्गदृश्यातून कदाचित् लाभत असली तरी प्रत्यक्ष परिणती 'अॅब्स्ट्रॅक्ट' आहे. रंगांचा मोजकेपणा कायम आहेच; शिवाय पांढरा रंग मिसळून वरेचसे रंग ते वापरतात त्यामुळे हे रंग पाहताना मन उल्हसित झाल्याचा अनुभव येतो. एकंदर रंगसंगतीच इतकी चपखल असते की विशिष्ट निसर्ग-दृश्यात्मक तपशील चित्रात मांडलेला नाही किंवा ओळखता येत नाही अशी तक्रार करणे योग्य ठरत नाही.

काही चित्रकार ज्याप्रकारे रंगांचा वापर करतात त्यावरूनच त्यांची प्रगल्भता लक्षात येते. रामकुमार हे अशा चित्रकारांपैकी एक.

बडोद्याच्या दोन चित्रकारांची प्रदर्शने जहांगीर आर्ट गॅलरीत भरली होती. गुलाम महमंद शेख हे एक आणि जेराम पटेल हे दुसरे. रामकुमार हिंदीत कथा लिहितात तर शेख गुजरातीत कविता लिहितात! प्रदर्शनाला जोडून आपल्या कवितांचे इंग्रजी अनुवाद वाचण्याचाही त्यांनी एक कार्यक्रम केला.

शेख यांची काही चित्रे 'पॉप' आर्टच्या धर्तीची होती. 'पॉप आर्ट म्हणजे 'पॉप्युलर' आर्ट – म्हणजे सामान्यजनांना समजणारी नव्हे परंतु सामान्यजन दैनंदिन व्यवहारात जी ओबडधोबड कला वापरतात तिच्यापासून स्फूर्ती घेणारी कला. तिच्या आविष्कारात चित्रकार बहुधा फक्त रंगांचा वापर करून थांबत नाही. उदाहरणार्थ, एका वेड्याच्या इस्पितळाच्या आवारातील बगिच्याचे शेख यानी रंगविलेले चित्र घ्या. यातील बगिच्याचे फाटक कॅनव्हासवर रंगविण्याऐवजी एका छोट्या लाकडी फाटकाचा भाग त्यानी त्या जागी चिकटविलेला होता. चित्राच्या माथ्यावर देवदेवतांची गुळगुळीत कागदावरील रंगीत चित्रे कातरून चिकटविलेली होती, आणि या चित्रांच्या शैलीतील सांकेतिक अपरिपक्वतेमुळे प्रसारित होणारी एक प्रकारच्या भाबडेपणाची भावना चित्राच्या आस्वादाला पोषक ठरत होती!

अर्थात् या शैलीतील त्यांची चित्रे फार थोडी होती. उरलेली बहुतेक निसर्गदृश्ये होती. ही दृश्ये रंगविण्याची शेख यांची एक वेगळीच धाटणी आहे. दोन भिन्न रंग जेथे मिसळतात तेथेच रंगछटा दाखविली जाते, एरवी प्रत्येक रंग एकच एक गडद किंवा तरल छटेत कॅनव्हासवर उतरतो. झाडांचे आकार आणि मानवी आकार या दोहोंची एक प्रकारची मजेदार गुंफण या निसर्गदृश्यात दिसते. त्यामुळे ही चित्रे एक वेगळाच काव्यात्म परिणाम साधून जातात.

जेराम पटेल हे आपल्या 'अॅब्स्ट्रॅक्ट' चित्रांसाठी रंगांव्यतिरिक्त आणखी कितीतरी विविधतापूर्ण, अत्याधुनिक साधने वापरतात. उदाहरणार्थ, त्यांच्या कित्येक चित्रांची उभारणी ब्लोटॉर्चने अंशतः जाळून काढलेल्या लाकडावर झालेली असते! लाकडावर त्यामुळे काही आकृत्याही काढल्या जातात आणि त्याला एक नावीन्यपूर्ण पोतही लाभते.

(पृष्ठ ६२ वर पहा)



—आशा केळकर

# राधा :

[१]

···राधा आणि मी—एवढ्या सीमित जगात आता-आतापर्यंत मी सुखी होतो···वावटळीने गरगर फिरणाऱ्या पालापाचोळ्याच्या परिघात स्तब्ध मोकळी जागा सुटावी तसा मी समाजापासून अलग पडलो होतो . . . राधा आणि मी—एक धुंद, मुक्त विश्व . . .



असं अवेळी कां वरं बोलावलंस आज, श्याम ? चैत्रातील ऊन पायांना चटके देतंय् चालताना. अगदी निघताना माळलेला गजरा येई येईतो सुकला सुद्धा. तरी मी आले आहे हं वेळेवर. तू म्हणाला होतास कां तू दुपारीच इथे येशील आणि आता मात्र तुझा पत्ता नाही. किती वेळ थांबू मी अशी मधेच ? या झाडाची सावली अगदी नावापुरतीच तुझ्या वाटेकडे नजर उचलली की मालवल्यासारखी होते आहे या उन्हाने. तू आल्यावरोबर या डोहात आपण उतरूया असं म्हणणार आहे मी. मुलुखाचा चोखंदळ तू ! उन्हाउन्हाने कोळप-लेले, अंगराग आणि धर्मविन्दु यांचा मिश्र दरवळ लपेटलेले, आणि किंचितही आडोसा नसलेले चुंबन मी तुला देऊ केले तर तुझ्या कपाळावर एक सूक्ष्म आठी उमटेल याची मला कल्पना आहे.

पण श्याम, जेव्हा तेव्हा हट्ट चालवतोस हे काय खरे कां रे ?

माझ्या नकळत कधी माझ्या मनात येतं की आल्या आल्याच तू मला जवळ घ्यावंस. नको ती मुरली, तो अवखळपणा, तो नर्म-विनोद. दोन पाखरं झरंकन ओठात ओठ मिसळतात तसं एकत्र यावं ! अगदी एकदा.

पण मी वेंधळी स्वप्नातच गुंगले आहे. आता तर ऊन कलायला लागलं. तू विसर-लास यायचं ? कां आसपास लपून माझी उदास मुद्रा न्याहाळीत आहेस ? नको रे असा छळू !

[२]

मी तुझी रोजची सोबतीण. पण आज येताना मला हुरहूर वाटली, संकोच वाटला. गडबडीने स्नान करून मी गजरा माळला, आणि काजळसुद्धा न लावता यमुनेची वाट धरली हे सासूबाईंनी आपल्या नेहमीच्या तीक्ष्ण दृष्टीने न्याहाळून घेतलं. 'हो' 'नाही'-पलीकडे आमचे एकमेकींशी संभाषण कधीपासूनच तुटलंय. 'कुणी-कडे निघालीस' असं नाही विचारलं त्यांनी. तरीपण ओशाळं वाटलं, अवघड वाटलं आज.

अनय पानावर बसले होते. रोज निदान दुपारचे जेवण त्यांना स्वतः वाढायचा कटाक्ष असतो माझा. तूं काल सुचवलंस् आज दुपारी भेटूया, आणि मी आले. कधी कधी राग येतो वघ स्वतःचा मला. कधीच कसं नको म्हणत नाही मी तुला! प्रयत्न करूनही मला जमतच नाही.

तू माझ्याकडे पाहिलंस की क्षणभर हृदयाचं स्पंदनसुद्धा बंद पडतं. असं वाटतं की या नजरेचाच आधार घ्यावा, डोळ्यातून प्रवेश करावा. अनंग व्हावं आणि तुझ्यात सर्वस्वी मिसळून जावं.

आता मात्र तू आला नाहीस तर मी बोलणारच नाही तुझ्याशी. कधीसुद्धा. मी आपली डोळे मिटून घेते कशी. मग तू येशील. आणि मोरपिसाहूनही हलक्या हातानं कपाळावरच्या बटा मागे सारशील. आणि म्हणशील, 'राधे, राधिके . . . . राधाराणी, मी आलो ना.' पण आज मी तरीसुद्धा स्वस्थ राहणार, डोळे न उघडता.

डोळे मिटले तरी तूच दिसतो आहेस सारखा. पण श्याम, मी भारीच शिणले आहे रे आज! पहाटेपासून जी उभी आहे कामाच्या तालावर ती आता कुठं रेलले आहे या झाडाला. माझे डोळे खरंच जडावत आहेत. आणि उजाडता घेतलेल्या पेलाभर दुधानंतर मी कशाला शिवलेली नाही. खरोखरच झोप लागणार मला. रागावू नकोस हं!

* *

## आणि कृष्ण :

[१]

यायचं नव्हतं आणि येणं टाळायचंही नव्हतं. ही तर स्वस्थ झोपली आहे. तेही एक प्रकारे बरंच आहे. जागी असती तर मग तिचा कृतक्कोप, माझी चतुर मनधरणी, तिचा आवेग, आणि माझा तथाकथित चोखंदळपणा, जलविहार या सर्व सुपरिचित अवस्था क्रमाक्रमाने पार पडल्या असत्या. जसे काल तेच आज आणि तसेच उद्या. एक स्थिर प्रतिबिंब--नवखेपणा संपलेले.

नाही, उद्या नाही. निश्चित नाही. उद्या पहाटे नंद यशोदा जागे व्हायच्या आत मी पश्चिमेला निघून जाणार. कानात सांदीपनी महर्षींचा आशीर्वाद घुमत आहे. 'कृष्णा, द्वारकाधीश हो. आपल्या क्षात्रकुलाचा विसर पडू देऊ नकोस.'

गुरुजींची इच्छा होती की २५ व्या वर्षापर्यंत आश्रमात राहावे. माझ्या मनस्वी स्वभावापुढे नाईलाज झाला त्यांचा. ती मलूल मूर्ती आठवली म्हणजे आता त्या विषादाचा अर्थ कळतो. त्यांचे मी ऐकेन. द्वारकेच्या निर्माणासाठी फक्त माझ्या शस्त्रांच्या संगतीत जाणार. मुरली मी इथेच ठेवणार, गोकुळात.

आश्रम सोडून मी गोकुळात परत आलो तो नंद-यशोदेच्या ओढीने. नावाचा क्षत्रिय, पण गाई-वासरांच्या मागे हुंदाडण्यात मी मस्त होतो ना. दहाव्या वर्षी जेव्हा सांदीपनींचे नाव मी पहिल्यांदाच ऐकले तेव्हा दिवसभर हट्ट व धुमाकूळ केला होता. यशोदेच्या मनात चलबिचल झाली. ती म्हणाली होती 'राही ना आपल्याजवळ आणखीन् एखाद-दोन वर्षे. त्याचे तरी पोरवय. आणि बुद्धी इतकी कुशाग्र की इतर शिष्य वर्षानुवर्षे लावतील तिथे ते हा चटकन् आत्मसात् करील. अगदी आताच कशाला पाठवायचं त्याला?'

आणि नंदराजांचे ते उत्तर. "चुकतेस तू यशोदे. माझा श्रीकृष्ण गवळ्याचा पोर नाही. इतके दिवस इथे राहिला हे आपले भाग्य. पण क्षत्रियाला योग्य अशी विद्या त्याला देण्यात आपली हयगय झाली तर वसुदेवांचे अपराधी होऊ. आप्तांना, ज्ञातिबांधवांना डावलून रातोरात त्यांनी माझ्याकडे धाव घेतली. त्या विश्वासाचा बदला मी असा देऊ?"

दरवाजाआड गुपचूप उभा राहून उत्सुकतेने आई-बाबांचे बोलणे ऐकल्यावर मला वज्राघात झाल्यासारखे वाटले. "मला तुम्हा दोस्तांना सोडून आणि धनुष्यबाण घेऊन कुठल्यातरी गुरुजींकडे मंत्र शिकायला व हालात दिवस काढायला जायचेच नाही. बघ आई बाबा माझा हट्ट पुरवतात की नाही." अशी मी इतर गोपाळां-जवळ बढाई मारून आलो होतो. माझ्या नजरेपुढे जिथे तिथे एकच प्रश्न होता, 'कोण हा वसुदेव?'

यशोदा बाहेर पडायच्या आत मी तिथून धावतच निघालो सरळ राधेकडे आणि तिच्या पदरात डोके खुपसून कितीतरी वेळ मनसोक्त रडलो मी.

[२]

अरे, ही तर अजूनही जागी होत नाही. दमली असावी सकाळपासून. तिची झोपमोड करावी का? तिला मी जे सांगणार नाही, पण जे अटळ आहे, त्याचा आघात तिच्याजवळ आणू का?

कुणी सांगावे, माझ्या निश्चयाची दृढता तिच्या मादक, निद्रेने सुखावलेल्या दृष्टीत तीव्रतर होऊन खुपसेल. माझ्या मनःस्थितीची चाहूलही लागू न देता, एकवार पूर्वीसारखे, फार फार पूर्वीसारखे, एकमेकात विलीन व्हावे असे ना मी ठरवले आहे. विश्रब्धपणे ती माझ्या कुशीत विसावली की हलकेच तिला दूर सारीन आणि मी निघेन. मी गोकुळातून कायमचा गेलो हे तिला उद्या कळल्यावर एवढा तर तिला दिलासा होईल की जायच्या क्षणापर्यंत मी तिचाच होतो.

[३]

अगदी लहानपणापासून राधा मला फार आवडायची. तिचे गोरे गोरे हातपाय, साईसारखे मऊमऊ गाल आणि फक्त माझ्याकडे पाहून हसणारे पण एरव्ही सदा व्याकुळ असे काळेभोर डोळे! तिच्याबरोबर दंगा करावा, मग तिच्या घरातून हळूच लोण्याचा गोळा आणून तो भरवून घ्यावा, तिच्या नागिणीसारख्या








वेणीबरोबर खेळावे आणि तिच्या घरकामात व्यत्यय आणावा. केवळ निजण्यापुरता मी यशोदेजवळ होतो. बाकी दिवसभर तिच्या मागे मागे असे.

मला नीट आठवत नाही. आठ-एक वर्षाचा असेन मी. मी तिचे डोळे झाकले तेव्हा तेच हात ओढून घेऊन ती पाठमोरी वळली. तिचा चेहरा विलक्षण चमकत होता. डोळे आसवानी भरून आले होते. "किती लहान आहेस रे वेड्या तू" असं म्हणून माझ्या ओठांचा तिने मुका घेतला. "हट्, हे काय" म्हणून मी दूर झालो. ती एक असं रडवेलं हसू हसली की त्या वयातही मला एक खोल कळ लागली. असे वाटले की राधेला रडवणाऱ्या साऱ्या साऱ्या माणसाना ठार मारावे – सगळ्यात आधी अनयदादाला. आईच्या धाकाने मी त्याला अनयदादा म्हणायचा. पण अंगाने मरतुकडी, रूपाने वावळी आणि सदान्कदा राधेवर खसवसणारी ती स्वारी पाहिली की जीभ बाहेर काढून वेडवावे असंच वाटे.

[४]

शेवटी मला आश्रमात जावेच लागले. नंदराज (तेव्हा-पासून मी त्यांना कधीच बाबा म्हणून हाक मारली नाही) मला वेशीपर्यंत पोहोचवून परत गेले. गुरुजींनी दोन जटाधारी आडदांड ऋषिकुमार मला नेण्यासाठी पाठविले होते. कदंवाला वळसा घालून आम्ही वळलो मात्र आणि वेलींच्या जाळीआडून राधा सामोरी आली. हुंदक्यांनी तिचे शरीर गदगदत होते. ती खूप काहीतरी बोलली – बोलण्यासाठी धडपडत होती. तिने आवेगाने जवळ घेतल्यामुळे मी घुसमटून गेलो होतो. निग्रहाने ओठामागे ठेवलेले माझे अश्रू तिच्यामुळे टपटप बाहेर पडू लागले. 'राधे, रडू नको ना. मी येणार परत" असं मीच तिला समजावीत होतो. आणि आयुष्यात प्रथमच मला तिचा रागही आला होता. मी रडका आहे असे जाहीर झाले तर आश्रमात सारे कुमार माझी हुर्यो करतील असं माझ्या मनाला चाटून गेले. मी जाणार हे काल निश्चित झाले असताना आयत्या वेळी लपतछपत येऊन राधेने कां रडावे हे उमगत नव्हते. अखेर मीच एक हिसका मारून तिच्या मिठीतून सुटलो आणि त्या दोघा ऋषिकुमारांना गाठण्यासाठी जो धावत निघालो तो मागे न पाहताच.

मी क्षत्रियाचा पुत्र आहे; मी कधीतरी राजा होणार: असे नंद-राजांनी समजावून सांगितल्यावर खरे म्हणजे आश्रमात जाणे मला थोडेथोडे आवडायला लागले होते. इतर मित्रांहून वेगळी अशी विद्या मी शिकणार याचा गर्व वाटायला लागला होता. माझी फजिती सर्वांसमोर – म्हणजे त्या जटाधारी राक्षसांसमोर केल्याची चीड वाटून मी राधेने मारलेल्या हाकेकडे लक्षच दिले नाही.

[५]

त्यानंतर मी तिला पाहिले ते वसंतोत्सवात – बरोबर सहा वर्षांनी. मी परत आलो म्हणून नंदराज व यशोदा विशेष खुषीत होते. मी गोकुळात पाऊल ठेवताच पुष्पनृत्याला सुरुवात झाली. अग्रभागी राधा होती. डाळिंबी कंचुकीने रोखून धरलेल्या तिच्या वक्षःस्थळांकडे दृष्टी गेल्यावर स्वतःशीच मी लाजलो. आता मी लहान नव्हतो. ताडासारखा उंच झालो होतो. ओठांवर काळी तारुण्यरेषा उमटली होती. रुबाबाने इकडे तिकडे पाहात मी नृत्यांगणात उतरलो तेव्हा इतर गोपाळ संकोचाने दूर झाले. त्यांच्या नजरेत मी राजपुत्र होतो. शिवाय धनुर्विद्येत पारंगत, शास्त्राध्यय-नात कुशल. त्यांची अपेक्षा नव्हती की अनार्यकाळापासून चालत आलेल्या प्रमत्त पुष्पनृत्यात मी सामील होईन. नंदराजांच्या चेहऱ्या-वर किंचित्काल रोष दिसला. यशोदाईच्या चेहेऱ्यावर होता अभिमान 'कृष्णाला गोकुळ परके नाही. इथल्याच मातीत लोळला तो आणि माझाच पान्हा प्याला तो.'

त्यानंतरची आठ वर्षे कशी विजेच्या वेगाने सरली. वसुदेवांचा निरोप आला, मी मथुरेला गेलो, कंसाचा वध केला, आणि राज्यावर तात वसुदेव आरूढ झाल्यावर गोकुळाला परत आलो. या घटना घडल्या, काळाने आवश्यक म्हणून माझ्याकडून करवल्या. पण माझ्या जीवनाचे मख्य सूत्र होते 'राधा'.

राधा आणि मी – एवढ्या सीमित जगात आता आतापर्यंत मी सुखी होतो. नंदराजांची प्रतिष्ठा, माझे क्षात्रकुल, वसुदेवांचे निरोप, अनयाचा दुवळा क्रोध, राधेच्या सासूचे मर्मभेदी वाग्बाण यांचा माझ्यावर काही परिणाम होत नव्हता. वावटळीने गरगर फिरणाऱ्या पानांच्या परिघात स्तब्ध मोकळी जागा सुटावी तसा मी समाजाच्या अलग पडलो होतो. राधा आणि मी – एक धुंद व मुक्त विश्व.

[६]

आणि आज मला माहीत आहे की मी जाणार. मागे न वळता आणि परत न फिरण्याकरता. मला स्वस्थ वाटत आहे. आनंदी नसलो तरी शांत आहे. सत्य चमत्कारिक असते. स्वतःला फसविणे मला जमणार नाही. पण तिला सत्य सांगायचा माझ्याजवळ धीरही नाही.

कधी वरं वदललं माझं मन? एकदा वाटतं, पुरे झाली ही आत्मपरीक्षा. राधा जागी असती तर सगळा गुंता कसा चटकन् सुटला असता. हास्यविनोद, रुसवा, आराधन, जलक्रीडा, आणि ती विश्रांती घेत असताना माझे प्रयाण. उठवू का तिला? पण नकोच. आपल्याशीच स्वच्छ विचार करताना कसे मोकळे होत आहे मन.

लहानपणापासून मी लाडका, मी मनस्वी. खेळायचे ते माझ्या मर्जीने. जिंकणारा मीच. कुणा वडीलधाऱ्या माणसाला माझा राग आलाच तर नंदराजांचा मला पाठिंवा. सांदीपनी गुरुजींच्याकडे जर मी गेलो नसतो तर लाडाने वाया गेलेला एक उनाड मुलगा एवढेच इतिहासाने वर्णन केले असते. आणि आज मी जर गोकुळ सोडले नाही तर विलासप्रिय आणि कर्तृत्वहीन राजांच्या मालिकेत मी बसेन.

मी जाणारच. मी क्षत्रिय आहे. स्वपराक्रमाने पुरुषोत्तम होण्याची मला आकांक्षा आहे. यश येणे न येणे दैवाधीन असले तरी या सीमेत गुंतून पडण्याने, गरुडाची झेप पंखात असताना चिमणीसारखे माझे आयुष्य जाईल. राधेला माझे मनोगत कधी समजले नाही. मी

अनुक्रमणिका

लहान, अवखळ, माझे पोरवय अशी भाषा तिच्या तोंडून ऐकली की मी खळवळून जातो. मनापासून प्रेम मी केले ते तिच्यावर. ती लावण्यवती होती, यौवनाने परिपूर्ण झाली होती तेव्हा यशोदेच्या मांडीवर खेळणारा छोटा श्याम होतो हे अजूनसुद्धा तिला विसरता येत नाही.

[७]

ज्याक्षणी मी राधेचे जाणूनबुजून पहिले चुंबन घेतले तेव्हा माझे बालपण त्या क्षणात संपले. ती माझी प्रिया आणि मी तिचा रसिक प्रियकर असे मला वाटले. राधेसारखी अतृप्त, मादक, शृंगाराला अनुकूल मृगनयना आपल्या चंचल कटाक्षानी एकप्रकारे मला आव्हान देत होती. मग मी बाळ होऊन तिच्या कुशीत स्वतःला लपविणे कसे शक्य होते.

नंदराज आणि मी एकमेकाना दुरावलो ते राधेमुळे. त्यांच्या आश्रयाने राहणाऱ्या अनयासारख्या एका कःपदार्थ माणसाच्या पत्नीची मी अभिलाषा करावी हे त्यांना सहन न होणे वरोबरच होते. माझ्या जन्मदात्या वसुदेवांचा मित्रसंबंध लक्षात घेऊन ते गप्प राहिले. माझ्यावर सतत मायाच करणाऱ्या यशोदेच्या वात्सल्यानेही हरप्रकारे माझे रक्षण केले असेल. तिने राधेला लहानपणापासून पाहिलेले. तिच्या मनातले शल्य जाणणारी यशोदाईच. स्वतःचा लाडका मुलगा असे जगावेगळे करू पाहतो म्हटल्यावर कुठल्याही आईने राधेचा दुःस्वास केला असता. पण माझ्याकडे पाहताना सत्य-असत्य, न्याय-अन्याय, नीती-अनीती असा विचारच ती करीत नाही. तिने एवढे जाणले की तिचा श्याम राधेशिवाय राहू शकत नाही आणि राधा श्यामशिवाय.

आईची वेडी माया माझ्या हक्काची होती. पण अशीच वेडी माया राधेनेही माझ्यावर मधून मधून करावी हे इतकी वर्षे मला सलत राहिले. कुणाचाही अंकित होऊन राहिलो हे मला सहन होणार नाही. मी आत्मकेंद्रित आहे हे गुरुजींच्या चतुर दृष्टीला केव्हाच दिसले. त्यांनी मला नित्य सांगितले की स्वतःच्या पराक्रमाला योग्य असे नवे क्षेत्र शोध. द्वारकाधीश हो. प्रतिदिनी विस्तारत जाणाऱ्या क्षितिजाचा वेध घेऊन उंचउंच चढत राहणाऱ्या पर्वतप्रेमी युवकाचा आदर्श डोळ्यासमोर ठेव. मी स्वतःला ओळखण्याआधीच गुरुजींनी मला जाणले. समतोल, सुसंस्कृत, उदार असे माझे गुरुजी होते. पण तेव्हा त्यांना मी दुखावले आणि इथे निघून आलो. सांगायला नंद–यशोदेची ओढ होती, आणि मनात हेतू होता स्वच्छंद वर्तनाचा. आश्रमातील कठोर परिचर्येनंतर गोकुळाचा मोह जबर ठरला.

[८]

राधा, जागी हो ना! विचारांचे हे आवर्त मला एकटयाला झेपत नाही. आहेस याहून तू जरा वेगळी असतीस तर मी गोकुळ सोडले नसते – सोडू शकलो नसतो – अगदी कल्पान्तापर्यंत. पण तू मला अशी स्वतःमध्ये वेढून घेतेस. मोठ्या प्रयत्नाने मी सावध आणि अलिप्त राहू पाहतो. पण तुझा माझा मेळ तोडू म्हणता तुटत नाही. यमुनेचा किनारा, चांदण्यात न्हालेली रात्र, मुक्त केश-कलापात दडलेले तुझे मुख, आणि भुजंगाप्रमाणे लोलुप झालेला मी – या आठवणी वगळल्या तर माझे जीवन, राजहंसाने दूध शोषून घेतल्यावर शिल्लक पाण्यासारखे निःसत्त्व, कस्तुरी सांडलेल्या मृगासारखे निष्प्रभ.

अशाच मोहाने मी आठ वर्षे इथे अडकून पडलो. स्वतःला सावरायला मला इतका दीर्घ काळ लागला हा माझा कमकुवतपणा, तुझा विजय, की नैसर्गिक प्रवृत्तींची मनावर मात? राधे, तू अशी कां आहेस? मी तुझा व्हावे, तुझ्याशिवाय इतर कसलेच अस्तित्व मला राहू नये हा काय तुझा हट्ट! तुला तुझे मन ठाऊक नसेल इतके ते मी जाणतो. अलीकडे तर आपल्या सरत्या यौवनाची चाहूल लागल्या-वर तू अधिकच मत्सरी झाली आहेस. यशोदेबद्दलचा माझा नितांत श्रद्धाभावसुद्धा तुला आता खुपतो. मग शेवंतीसारख्या गोपिकेने धीटपणे उत्सवात सर्वांसमक्ष मला नृत्याचा जोडीदार निवडावे हे तुला कसे रुचणार? अधुनमधून या ना त्या गोपीवरुन आपली धुसफूस चालू असे. पण शेवंतीबरोबर केलेल्या नाचानंतर तू आण-लेला आवेश, आणि विवाहित स्त्रीला साजेलसा अधिकारयुक्त क्रोध! त्या दिवशी मी तुझी समजूत घातली, पण गोकुळ कायमचे सोडून जाण्याची कल्पना अगदी ठाशीव रूपाने तेव्हा माझ्या मनात आकारली. तू माझी पत्नी नाहीस, माझ्या मुलांची माता होण्याचा तुला अधिकार नाही. सरत्या यौवनाचा विषाद कृत्रिम आभूषणांमागे लपवू लागशील तू आणि मी युवागौरवाच्या शिखरावर असेन!

मला तू प्रिया म्हणून हवी होतीस. पुष्प आणि सुगंध, वर्षा आणि मयूर असे मी मीलन मागत होतो. माझ्या महत्त्वाकांक्षेला गवसणी घालण्याकरिता प्रत्येक वेळी क्रुद्ध वाघिणीप्रमाणे सज्ज न होता तू जर मला साथ दिली असतीस तर! प्रियेच्या सहवासात प्रियकराने सतत राहावे हे अगदी अव्यवहार्य आहे, राधिके. मी अखेर पुरुष आहे. तू माझा विसावा आहेस, माझ्या जीवनाचा अत्यंत कोमल असा तन्तु आहेस. पण तुझा सहवास हेच माझे जीवन होऊ शकत नाही. साहसाने ज्याने श्री खेचून आणायची त्याने काय नंदराजाच्या कृपेवर जगावे?

[९]

तुला हे पटवण्याचा खटाटोप निरर्थक आहे. तसा प्रयत्न करताना माझी बोटे पोळली आहेत. राधे, मी असाच जातो आता. तू जागी झालीस तर आणखी एक शृन्गारपर्व; किंवा मी चुकून खरे बोलून गेलो तर एखादे मर्मभेदी वाग्द्वंद्व. भावनांनी लडबडून घेण्याचा मला कंटाळा आला आहे. तुझा निरोप न घेताच जातो. तू काहीही म्हण, पण गेले हे पाहिजे. तू आणि मी जर दोघे मिळून जाऊ शकलो असतो तर माझ्या भाग्याला पारावार नव्हता. तुझा वियोग सहन करूनही माझे तुझ्याबद्दलचे स्वप्न मी कायम ठेवू शकेन. पण तुझ्यासह इथे राहणे अशक्य.

राधे, गेलो ग मी. रागावू नकोस!

● ● ●

अनुक्रमणिका

# होळी रे होळी ऽऽऽ ?

—वसंत देशमुख




काही शव्दांना शाव्दिक विधुरत्व कधीच लाभत नाही हे त्यांचं सद्भाग्य ! होळी ह्या शव्दात पुरणपोळी अनुस्यूत आहे. दिवाळी नि करंज्या, संक्रान्त नि तिळगूळ, महाशिवरात्र नि वटाटयाच्या तळलेल्या फोडी, दसरा नि आपटयाची पानं, गणपती नि मोदक लाडू, सत्यनारायणाची पूजा नि तुपानं थवथवलेला शिरा, संपादक आणि मानसिक कायमचा ताण, जुळारी नि चुका, टीकाकार नि ललितलेखनातील अपयश, सारंगी वाजविणारा नि खोल गेलेले गाल, चित्रपटनिर्माता नि केसांचे कल्ले, नाटक कंपनी आणि कर्ज, प्रबुद्ध प्राध्यापक नि मठ्ठ मुलं, स्त्री-सौंदर्य नि मिजास, राजकारण नि असत्य वर्तन, तत्त्वज्ञान आणि आर्थिक दारिद्रय, यशस्वी व्यापारी नि अप्रामाणिकपणा ह्या अशा जोडगोळ्या असतात.

आपल्याला तर बुवा होळीच्या सणासंवंधी अफाट आकर्षण आहे. त्याला तशी कारणंही महत्त्वाची आहेत. होळी हा एकच सण आहे की ज्या दिवशी जख्खड म्हातारे नि अक्कडवाज तरुण हे मनानं तरुण होतात. राष्ट्राच्या मनाला वर्षातून एकदा तरी टवटवीत ठेवण्याचं महान् राष्ट्रीय कार्य होळीचा सण होळी करीत असते ह्याची नोंद सूज्ञानी घ्यायला हवी.

ज्या राक्षसिणीच्या वधामुळं हा होलिकोत्सव साजरा होतो तिला खरं म्हणजे एखादं मरणोत्तर मिळणारं राष्ट्रीय मानचिन्ह बहाल करायला हवं. राक्षसीण मेली पण तिच्या चितेच्या ज्वालातून आनंदनिर्झर शतकानुशतके स्रवले हे केवढं पुण्यकर्म.

होळीचा सण मुक्रर करणाऱ्यांनी डोकं चालवलंय् हे नि:संशय ! पौर्णिमेचं पिठूर चाऽणंच पकडलं ! म्हणजे खेडयापाडयातून 'लाईट्'ची सोय अनायसेच झाली. ह्या सणाची सुरुवात आपल्या देशात झाली तेव्हा आपल्याकडे ग्रामीण विद्युत् योजना नव्हत्या, कोयना नुसती कृष्णामाईसारखी आपली शालीनतेनं संथ, संथ वहात होती. मोठमोठे हैड्रोइलेक्ट्रिक् प्रॉजेक्टस् नव्हते. शॉक् देणाऱ्या गोष्टी तेव्हा घडत नव्हत्या. साधीभोळी जनता आपला सामुदायिक आनंद पंचांगाच्या उपरण्याचा काठ धरून व्यक्त करीत होता.

होळी ह्या शव्दातच मोठी जादू आहे. तोंडाचं वोळकं झालेले अप्पा त्या दिवशी तुरुतुरु धावायला लागतात. एरव्ही ज्ञानेश्वरीच वाचणारे दादा, हातात चक्क पहार नाहीतर वत्ता घेऊन नि धोतर वरचसं वर करून होळीचा खड्डा खणायला सरसावतात. पोराना सारखे धपके मारणारा एखादा खाष्ट म्हातारा ह्या दिवशी संतांसारखा मृदु होतो नि पोरांशी हसूनखेळून मजा उडवितो.

संसारात रमलेल्या पुरुषांच्या मुद्रांवर एक मिश्किल रेषा उमटलेली असते . लहान असताना अर्वाच्य शव्द आपण तारस्वरात ओरडत गावातून हिंडत होतो. 'कुणाचं रे हे वात्रट कारटं ? ' अशी पृच्छा केली की कुणीतरी सांगायचं – तो ना ? वरल्या आळीतला ! वाडीवाल्याचा पोरगा !

मध्यवयानं आता वाचाशुद्धी झाली असली तरी त्या मसालेदार शव्दांची विस्मृती झाली असं नव्हे. पुरणपोळ्यांचा मस्त दर्प आता त्याच्या स्वयंपाकघरात दरवळतोय ! होळीला अर्पण करायचा प्रसाद सौ. आता पानात वाढीत आहे. केळीच्या पानावरची तांबूस पोळी मोठी सुरेख दिसते आहे. त्यानं आता रुंद जरीच्या काठाचा जांभळा पितांबर नेसला आहे. प्रसादाचं पान सावरीत तो खाली येत आहे. तो संपूर्ण गृहस्थाश्रमी म्हणून ! वाह्यात् फाका मारणारा वाडीकराचा तो व्रात्य मुलगा केव्हाच संपून गेलाय् !

पेंढयाच्या काडया हळुवारपणे वाजूला सारून तो प्रसाद खड्डयात ठेवतो. हाताना माती लागते थोडी. ती तो झटकतो. नि मग काडी पेटवतो. "दूर व्हा ! लांब व्हा ! " असा इशारा देऊन हिंदू काळजीपूर्वकपणानं तो होळी पेटवून देतो. तोच गार वाऱ्याची झुळूक येते नि होळीवरचं गवत झर्कन् पेट घेतं.

"वों वों वोंऽऽऽऽ!" वगैरे अनेक तऱ्हेच्या आरोळयांनी परिसर दणाणून जातो. वघता वघता गवत साफ जळून जातं नि ताठ काळपट ओंडके अग्निदिव्य करण्यास, सीतामाईच्या जिद्दीनं सरसावतात. अग्निप्रवेश करणाऱ्या एखाद्या सतीप्रमाणं ते ओंडके आपल्या कपाळांवर शेंदरी मळवट भरतात नि अस्फुट चित्कार सोडीत आत्मसमर्पण करतात.

त्यांच्यतून क्षीण ज्वाला उफाळत असतात. लालसर, शेंदरी पिवळ्या ! एखादी



अनुक्रमणिका

निळसर, हिरवट छटा ! गाठीवरचा भाग जळताना ! ह्या पिवळटसर प्रकाश आसमंत उजळतो. पुरणपोळ्या करकरून थकलेल्या बायका दुरूनच नमस्कार करतात. त्यांच्या घामेजलेल्या, म्लान मुद्रांवर त्या ओंडक्यांच्या ज्वालांतून झरणारा फिकट पिवळा प्रकाश पडतो. पसरलेले कुंकू, किटलेल्या नथी नि उन्नत उरोज ह्यांना आगळीच शोभा येते. कारण त्या फिकट, पिवळ्या मंद प्रकाशात, नितळ चांदण्याच्या रुपेरी वरसातीचा चंदेरी रंगही थोडा मिसळलेला असतो !

पण होळीचं खरं महत्त्व ग्रामीण विभागातच ! लाकडाची नि फाटचांची, पेंढ्यांची नि फांद्यांची ददात नाही. गावकरी मोठ्या उत्साहानं जंगलात जातात. त्यांच्यातला एखादा 'लक्षुमन' नाहीतर 'रामचंदर' मोठा इल्मी असतो. मध्यम उंचीचा, काळगेला, तरतरीत नाकाचा, चपळ नि कोयता झाडांवर तडातड मारण्यात एक्सपर्ट असा तो असतो. परशुरामाचा एक पराधांश अंश ह्या टाईपमध्ये असावा !

तंबाखूचं अर्ध पान लावलं की ह्या 'लक्षुमना'ला नाहीतर 'रामचंदर'ला हनुमानाचं बळ येतं. गावची एकजात तरुण पोरं टणाट्टण उड्या मारीत जातात. लक्षुमन झाडांचा अंदाज घेतो. "हाँ ऽ ऽ! त्ये ऽ ऽ ऽ! " सर्वांना ते झाड पसंत पडतं. झाडावर सारीजणं मग तुटून पडतात लक्षुमनाचा कोयता मुरारबाजीच्या सफाईनं दुपारच्या लखलखित उन्हात तळपतो.

नि मग वाजत गाजत, झाडाची पूजा करून, झाड गावात आणलं जातं. खड्डा तयारच असतो बहुधा ! पहिली पहार माझी म्हणून बाचाबाचीही होते होळी उभारली जाते.

मुलांच्या उत्साहाला सीमा नसते. बारक्यासारख्या फांद्या, गवताचे पेंढे आणणं, कुणाच्या छपरावरून ते चोरून आणणं, सारख्या बोंबा मारणं, होळीतले नारळ वडिलधाऱ्यांचा डोळा चुकवून काढणं, माकडासारख्या उड्या मारणं, कोकलणं नि एकंदरीत आनंदी, उत्साहमय वातावरणात हरतऱ्हेची भर घालणं इतक्या महत्त्वाच्या कामगिऱ्या ह्या बालचमूकडे असतात नि त्यांची अंमलबजावणी अगदी चोख केली जाते.

होळी मग जागविली जाते. भजनं म्हणू नका, गाणी म्हणू नका, लावण्या म्हणू नका की नुसतं केकाटणं म्हणू नका ! ढोल बडविणं, ढोलकी वाजविणं, रिकाम्या डब्यातून अजब नादब्रम्ह निर्माण करणं, डबडी वाजविणं, बोंबा ठोकणं, आरोळ्या मारणं असा एकंदरीत साग्रसंगीत कार्यक्रम असतो. हे कार्यक्रम पार पाडीत असताना स्त्रियांचं लोढणं ह्या दिवसापुरतं कुणाच्याच गळ्यात न पडल्यामुळं, सर्वांचीच मोठी सोय झालेली असते.

ह्या होलिकोत्सवाचं सर्वात मोठं वैशिष्ट्य नि आकर्षण हेच ! एक दिवस शिथिलता. एक दिवस कृत्रिम वागण्याची आवश्यकता नाही. वर्षभर माणसं खोटी खोटी वागत असतात. आपण नाही ते आहोत असं भासविण्यासाठी जीवाचा आटापिटा करीत असतात. जिभेवर आलेले अपशब्द घशात लोटीत असतात. बंधनं ! ! सर्वत्र बंधनं ! हसू नका ! नाचू नका ! गाऊ नका ! मजा करू नका ! टिंगल करू नका! कुणाची टर उडवू नका ! रोज कुटुंबात





अनुक्रमणिका








## स्वागत

(क्रांतिवीर मोहन रानडे ह्यांच्या डोंबिवली येथील (दि. २०–२–१९६९) प्रकट सत्कार प्रसंगी म्हणण्यात आलेली कविता)

पशूंचे पोलादी साखळदंड तोडून
आला आहे परत एक पुरुषोत्तम
पुरुषोत्तमांच्या ह्या देशात –
राम-कृष्णांच्या, शिवप्रतापांच्या
पुन्हा एकदा घडवायला
नवे रामायण।
नवे महाभारत॥
जिथे शब्दांना फुटतील आगीच्या जिव्हा
हात बनतील अग्निबाण
बर्षतील आग
जुलमी – पाशवी साम्राज्यांवर –
माणसालाच माणसाचे गुलाम करणाऱ्या!
तुटतील बंध गुलामीचे
गुलामातून उभा राहील नवा मानव
गर्जत "इन्किलाब झिंदाबाद!
"इन्किलाब झिंदाबाद!!"
तो दिवस उजाडेल।
तो दिवस उजाडेल, तेव्हा –
लिस्बनच्या तुरुंगात सांडलेल्या –
रक्ताची होतील रक्तकमळे
भिंती गातील गाथा पराक्रमाची
घामाच्या बिंदूतून फुलेल मोगरा
गंध उधळीत सृष्टीवर –
गात मुक्तीचे गाणे –
मानवाच्या!!
"ह्याचसाठी केला होता अट्टाहास
मुक्तीचा हा दीस उगवावा"
त्या तृप्तीत लाभेल खरा सत्कार
तोवर हे हार –
एक उपचार –
तरीही निरर्थक नाहीत!
कारण –
मायेतूनच घडते सेवा
घडतो त्याग
मायाच देते कर्तव्याची जाग
हारातले प्रत्येक फूल
देत आहे जाण –
नव्या रामायणाची!
नव्या महाभारताची
मित्रा,
ही तर नांदी—
नव्या युगाची!
मानवाच्या मुक्तीची!!
मानव मुक्तीची स्तोत्रे गाणाऱ्या पुरुषोत्तमा
घे हे स्वागत!
घे हे स्वागत!!
कधीही हार न खाण्यासाठी!!

**प्रभाकर अत्रे**

कोणीतरी मेलं आहे अशी मुद्रा धारण करून व्यवहार करा! ह्या सन्मार्गानं चाललात तर मग शेवटी मोक्षप्राप्ती मिळते, वगैरे! कुटुंबाची, आपल्याभंवतालच्या समाजाची, आपल्या संस्कारांची, संस्कृतिची, रुढींची, संप्रदायांची नि धर्माची इतकी अनंत बंधनं आपल्याभंवती पडलेली असतात की आपलं जीवन हे एक एकाद्या गुंतलेल्या मोठ्या हारासारखं असतं ह्याची आपल्याला जाणीवही नसते! पण होळीच्या दिवशी ही कृत्रिम बंधनं धडाधड कोलमडतात, कोसळतात. आबालवृद्धांचा शारीरिक नि मानसिक असा जणू कायाकल्प होतो.

मानव समाजाची खरी प्रवृत्ती ही, होळीच्या दिवशी जी आपल्याला दिसते, तीच खरी असते. आपण, आपला समाज, सारेचजण प्रचंड मुखवटे वर्षभर चढवितो. हे मुखवटे धारण करून वर्षाचे सर्व दिवस आपण वावरतो नि एकमेकांची दिशाभूल करण्यासाठी जीवाचं रान करतो.

पण पौर्णिमेच्या चंद्राला साक्षी ठेवून होळीच्या दिवशी, आपणच आपल्याला गवसतो. हरवलेलं बाह्य नि तारुण्य क्षणात उसळी मारून वर येतं. जळत्या ओंडक्यांच्या शेंदरट प्रकाशात जीवनातले हिरवेचार, रम्य दिवस आठवतात नि अंग क्षणभर शहारतं!

दूरवर गलका ऐकू येत असतो. ठायीठायी होळ्या पेटलेल्या असतात. शेंदरी रंगाचे पुंजके परिसर रंगवून टाकतात. रात्रीच्या गर्भाचा छेद घेत समाजपुरुष आनंदोत्सव बेहोषपणे साजरा करीत असतो. वृद्धांच्या मुखातून विसरलेली भाषा पुनर्जन्म घेते.

झाडामाडांच्या मागून चंद्रमा मिश्किलपणे हसत असतो. काठीला बांधून, होळीला अर्पिलेली कोंबडी एखादाच अस्फुट चित्कार करतात न करतात!

होळीची नशा सर्व समाजावर चढलेली असते. ढोलक्यावरच्या बोटांना नवचैतन्य प्राप्त होत. दाबून, अडवून, बांध घातलेली समाजाची श्रृंगारप्रियता धरण फुटून जशी कोसळावी तशी कोसळत, धडाडत उफाळते.

होळीभंवती गावाचं नि कुटुंबांचं गॅदरिंग् होतं. आजचा दिवस मजेचा, टिंगलीचा, बीभत्सपणा माफ करण्याचा, आट्यापाट्या खेळण्याचा, मनसोक्त धिंगामस्ती करण्याचा!

चंद्रबिंब म्लान होतं पण समाजपुरुष उत्तररात्रीही टवटवीत चेहऱ्यानं हसतखिदळत असतो!

ओंडक्यांनी! पहाटेपर्यंत कपाळावर भस्म चर्चिल्यासारखं वाटत असतं.

दूरवरचा गलका ऐकू येतच असतो!

• • •










# आगा जें घडलेंचि नाहीं!

—द. शि. खरात

पात्रे—

मृत्युंजय — डिटेक्टिव्ह
मोरू — साहाय्यक
गुणा — मोलकरीण
दिगंबर देशमुख
दादा देशमुख
फोन



[ सुरुवातीस गूढ वा भयानक वातावरण निर्माण करणारा म्युझिक-पीस. नंतर नेहमीप्रमाणे दार उघडल्याचा 'कर्रऽऽ' असा आवाज. नंतर हळुहळू दारातून लपत-छपत डिटेक्टिव्ह मृत्युंजय यांचा सहकारी मोरू प्रवेश करतो. तेवढ्यात 'खट्' असा आवाज होऊन मांजर पळून जाते. मोरू प्रथम घाबरून नंतर सुस्कारा टाकतो. नंतर हातातील मॅग्नीफाईंग ग्लासने खुर्ची न्याहाळतो. अर्थात् हे प्रसिद्ध डिटेक्टिव्ह मृत्युंजय यांचे ऑफिस आहे. जरा वेळाने डिटेक्टिव्ह मृत्युंजय प्रवेश करतात. ऑफिसमध्ये असणाऱ्या सर्व वस्तू आहेत त्यात फोन महत्त्वाचा ]

**मृत्युंजय**—मोरू, सावध आहेस ना. प्रत्येक हालचाल जपून करीत जा. कधी मृत्यू उभा 'दत्त' म्हणून राहील त्याचा नेम नाही.

**मोरू**—छे छे ! त्याची काळजीच नको. मी तुमचा सहकारी आणि तुम्ही म्हणजे मृत्यूचे कर्दनकाळ.

**मृत्युंजय**—मघाशी आवाज कसला झाला.

**मोरू**—तेच पाहतोय. बहुतेक दुसऱ्या मजल्यावरचा तो बोका असणार.

**मृत्युंजय**—(खुर्चीवर बसतात व लगेच उठत) छे छे ! इथे ओल आलीय रे. ही ओल कसली ?

**मोरू**—त्या बोक्याची करामत दुसरे काय ? साला कुठेही घाण करतो.

**मृत्युंजय**—छे छे ! नीट बघ. ही ओल विषारी असायची.

**मोरू**—तेच मी पहातोय. पण याला विषारी वास नाही.

**मृत्युंजय**—खात्रीनं सांगतोस हे.

**मोरू**—माझी खात्रीच झालीय. (खुर्चीवर बसत) थकलो बुवा आपण. आज फारच त्रास झाला.









अनुक्रमणिका

**मृत्युंजय**—आजची केसच तशी गुंतागुंतीची होती.

**मोरू**—माझं डोकच चक्कर झालं, बाकी तुमचे अंदाज चकत नाहीत म्हणा.

**मृत्युंजय**—तू नेहमीप्रमाणेच चकीत झाला असशील.

**मोरू**—चांगलाच थक्क झालो मी. मला वाटलं नेहमीप्रमाणेच खुनी हा बहुधा घरगडीच असणार.

**मृत्युंजय**—छे छे ! म्हणजे अजूनसुद्धा ह्या खनामागचे रहस्य कळले नाही.

**मोरू**—म्हणजे खुनी भलताच आहे वाटतं.

**मृत्युंजय**—वाटलंच मला, तुझा गोंधळ होणार म्हणून.

**मोरू**—मग सांगा ना बाबूजी खरं रहस्य काय आहे ते.

**मृत्युंजय**—हे बघ आधीच आपण थकलोय. तेव्हा मस्तपैकी आपल्या गुणाच्या हातची कॉफी आधी घेऊ. मग तुला सांगतो काय गंमत आहे ती.

**मोरू**—बाबूजी तुम्ही तर कमालच करता. काय आहे खरी गंमत?

**मृत्युंजय**—मोरू, या खुनाचे धागेदोरे फार खोलवर गेलेत. सत्य सांगायचं तर—

[तेवढ्यात फोन वाजतो.]

**मोरू**—थांबा, बाबूजी आधी फोन घेतो. ( फोन घेऊन ) हॅलो ! फोनमधून बाईचा घाबरा आवाज—अहो ! मला वाचवा !

**मोरू**—हॅलो वाचवा ! आपलं—मी मोरू बोलतोय–हॅलो–प्रसिद्ध डिटेक्टिव्ह. मृत्युंजय यांचा सहकारी—हॅलो—

**आवाज**—मला वाचवा हो ! कृपा करुन—

**मोरू**—हॅलो—आपण कोठून बोलताहात—आपण कोण ?

**आवाज**—मला वाचवा !

**मोरू**—अहो पण पुढचं बोला ना बाईसाहेब !

आवाज—प्लीज ! मला वाचवा !

**मोरू**—( वैतागून ) ते शक्य नाही. मला वाटतं या बाईला दुसरं कांही बोलायलाच येत नसावं.

**आवाज**—मला वाचवा !

**मोरू**—अहो बाई तुम्ही—छे छे ! पुरता गोंधळ. हे पहा तुम्ही असं करा. फोनवरून सांगायचं नसेल तर प्रत्यक्ष भेटा. हो प्रत्यक्ष—यायच्या आधी फोन नाही केलात तरी चालेल–चालेल.

**आवाज**—मला वाचवा !

**मोरू**—( रिसीव्हर जोरात आपटून ) मग मरा ! कमाल झाली. बाबूजी तिला मराठी भाषा येते का नाही कुणास ठाऊक. नवीन केस दिसतेय.

**मृत्युंजय**—ते मी ओळखलच होतं. मला वाटतं संकटात सापडलेली ही बाई सातव्या किंवा आठव्या मजल्यावरून बोलत असावी

**मोरू**—शंका आहे.

**मृत्युंजय**—शंका–कसली ?

**मोरू**—तिला वरचा मजला असेल याची. आज बरीच वर्षे तुमच्याबरोबर काम करतोय पण असली बाई भेटली नव्हती.

**मृत्युंजय**—मोरू. ही केसच जरा वेगळी दिसतेय. फोनमधून येणारा तिचा आवाज़ घाबरा अन् कापरा होता. तो आवाजच सारं काही सांगून गेला.

**मोरू**—पण बाबूजी एका वाक्याशिवाय—

**मृत्युंजय**—ते तुला आताच कळणार नाही. अग गुणा—ही मोलकरीण कुठं गेली. केव्हापासून कॉफीची वाट पाहतोय.

**मोरू**—( हाका मारतो ) गुणा—ए गुणा !

**गुणा**—( प्रवेश करून ) आल्येच म्या सायेब.

**मृत्युंजय**—हे बघ गुणा—

**गुणा**—सायेब, कुणीतरी माणूस तुमाला भेटाया आलाय.

**मृत्युंजय**—ते मी ओळखलंच होतं. गुणा, पाठवून दे त्याला आत.

**गुणा**—व्हय सायेब (जाते)

**मृत्युंजय**—मोरू, चल नोटबुक तयार ठेव. आपल्याला कामाला लागलं पाहिजे, काम हीच आपली विश्रांती.

**मोरू**—बाबूजी, फॉर युवर इन्फर्मेशन–तुम्ही सांगायच्या आधीच मी तयार आहे.

[ टॉक् टॉक् असा आवाज करीत बँडेज्स बांधलेला व काखेत कुबड्या घेतलेला दिगंबर देशमुख नावाचा माणूस येतो.]

**दिगंबर**—सॉरी ! पण मी तुम्हाला थोडा त्रास देऊ इच्छितो.

**मृत्युंजय**—अवश्य ! अवश्य ! आमची काहीच हरकत नाही.

**दिगंबर**—माझं नाव दिगंबर देशमुख.

**मोरू**—बापरे ! तुम्ही भलताच मार खाल्लेला दिसतोय.

**मृत्युंजय**—ते मी ओळखलंच होतं.

**दिगंबर**—बारीक नजर आहे तुम्हाला. पण मला आधी हे सांगा तुमच्यापैकी प्रसिद्ध डिटेक्टिव्ह मृत्युंजय कोण ?

**मोरू**—बाबूजींना कोण ओळखत नाही ? त्यांचा फोटो वर्तमानपत्रात पाहिलाच असेल तुम्ही.

**दिगंबर**—अहो, हल्ली वर्तमानपत्रातला फोटो खाली नाव असूनदेखील ओळखू येत नाही. म्हणजे आपण—

**मृत्युंजय**—होय मीच तो प्रसिद्ध डिटेक्टिव्ह मृत्युंजय. आपण उभे कां ? बसा ना. तुम्हाला अपघात झालेला दिसतोय.

**मोरू**—पक्षघात झाल्यासारखा वाटतोय.

**दिगंबर**—ते काही विचारू नका, जिवंत कसा राहिलो हेच नवल. खुनी हल्ल्यातून वाचलो हेच नशीब.

**मृत्युंजय**—खुनी हल्ला. मग तुमची केस मला सुरुवातीपासून ऐकली पाहिजे. खोटं काही सांगू नका. मला ते खपत नाही. माणसानं डॉक्टर, वकील आणि डिटेक्टिव्ह यांच्यापासून काहीसुद्धा लपवून ठेवू नये. काय मोरू ?

मृत्युंजय म्हणजे नामांकित (?) डिटेक्टिव्ह. दिगंबर देशमुखांच्या चुलत्याचा खुनी शोधून काढण्याचे काम ते पत्करतात आणि त्यातून कोणते रहस्य उलगडते ! ते रहस्यही नेहेमीप्रमाणे मृत्युंजयांनी 'आधीच ओळखलेलं असतं'च म्हणा !





अनुक्रमणिका

**मोरू**—होय बाबूजी कारण डॉक्टर, वकील आणि डिटेक्टिव्ह म्हणजे काळाचे काळ. तेव्हा हा हल्ला कोणी केला तेसुद्धा सांगा.

**दिगंबर**—आं ! ( बावरून ) तेच शोधण्यासाठी तर मी तुमच्याकडे आलोय.

**मृत्युंजय**—ते मी ओळखलंच होतं. काही हरकत नाही. सांगा तुमची हकीकत.

**दिगंबर**—माझं नाव दिगंबर देशमुख—आणि चुलत बंधूंचे नाव दादा देशमुख. आम्ही दोघेच भाऊ. माझे एक दूरचे काका होते. फारच श्रीमंत होते. त्यांचं नाव रावसाहेब बारटक्के.

**मृत्युंजय**—( आश्चर्याने ) कोण ? रावसाहेब बारटक्के ! ते तर परवाच वारले. पेपरमध्ये वाचलं मी त्यावद्दल.

**दिगंबर**—होय, तेच रावसाहेब बारटक्के. माझे काका. मरणापूर्वी काही दिवस त्यानी आपलं मृत्युपत्र करून ठेवलं होतं.

**मोरू**—म्हणजे शेवटी मृत्युपत्र आलंच तर—

**दिगंबर**—पण मृत्युपत्र केल्यापासून माझा चुलत भाऊ दादा देशमुख अगदीच विचित्रपणे वागू लागला. एक दिवशी त्याने माझ्या काकाना म्हणजे रावसाहेब बारटक्क्याना जिन्यावरून धाडकन् खाली पाडले होते. एकदा तर गच्चीत उभ राहून त्याने खालून जाणाऱ्या काकांवर चक्क खुर्ची फेकली.

**मोरू**—पण त्यानी खुर्चीच कां फेकावी ?

**मृत्युंजय**—कारण टेबल त्याना उचलता आलं नसावं.

**दिगंबर**—या साऱ्या गोष्टी अपघाताच्या नावाखाली मी डोळचाआड केल्या.

**मृत्युंजय**—ते मी ओळखलंच होतं.

**दिगंबर**—पण एक दिवस फारच भयंकर घटना घडली. तिला अपघात म्हणणं म्हणजे निव्वळ मूर्खपणा. ( मध्येच खोकतो ) जरा पाणी मिळेल का ? (मोरू पाण्याचा ग्लास देतो तो पिऊन )—त्याचं काय झालं—

**मृत्युंजय**—घावरू नका—सावकाश सांगा तुमची कहाणी—

**दिगंबर**—त्या भयंकर रात्री काकांच्या खोलीतून कसला तरी भयंकर आवाज आला. मी धावत तिकडे गेलो.



**मोरू**—मध्यरात्री तुम्ही जागेच होता ?

**दिगंबर**—होय. मला झोपच येत नव्हती. म्हणून धावत गेलो, पाहातो तर काय ?

**मृत्युंजय**—काय पाहिलंत तुम्ही ?

**मोरू**—पाहिलंत काय तुम्ही ?

**दिगंबर**—काय पाहिलं ? बापरे ! पाहतोय तर खोलीचं दार वद. म्हणून दाराच्या छिद्रातून आत पाहिलं. आत—आत माझे चुलतबंधू दादा देशमुख होते.

**मोरू**—कोण, दादा देशमुख होते ?

**दिगंबर**—त्यानी काकांच्या चेहऱ्यावर काळा बुरखा घातला होता. त्या बुरख्याच्या दोरीचं टोक तुळईवरून खाली सोडलं होतं.

**मृत्युंजय**—त्यावेळी तुम्ही काहीच केलं नाहीत.

**दिगंबर**—मी इतका घावरलो होतो की मला ओरडताच आलं नाही.

**मृत्युंजय**—मग पुढे काय झालं ?

**दिगंबर**—मग दादा देशमुखांनी हातातला दोर हिसका देऊन खाली ओढला. अन् काय आश्चर्य माझे काका हवेत लोंबकळू लागले, माझा संशय जास्तच वळावला.

**मृत्युंजय**—रावसाहेवांनी काही धडपड केली ?

**दिगंबर**—प्रथम प्रथम केली मग ती धडपड हळूहळू शांत झाली. शेवटी कायमचीच.

**दिगंबर**—ते मी ओळखलंच होतं. मोरू तुला काय वाटतं यावरून ?

**मोरू**—बुरख्याच्या आत कोण होतं हे ओळखल्याशिवाय मला काहीच सांगता येणार नाही.

**मृत्युंजय**—अगदी बरोबर. बुरख्याच्या आत रावसाहेब बारटक्केच कशावरून असतील. पण दिगंबरपंत, एवढं झाल्यावर तुमचे काका म्हणजे बुरख्यातील ती व्यक्ती खरोखरच मृत्यु पावली काय ?

**दिगंबर**—ते पुन्हा जिवंत झाले नाहीत यावरून मला वाटतं—

**मृत्युंजय**—पण काय हो तुमच्या काकांच्या मृत्यूमुळे तुमच्या चुलत भावाचा काही फायदा झाला का ?

**दिगंबर**—सध्या तरी नाही. कारण मृत्यूपत्रात काकानी सारी संपत्ती माझ्याच नावे केली आहे.

**मोरू**—म्हणजे काकांच्या मृत्यूमुळे तुमचाच फायदा झाला.

**दिगंबर**—परंतु माझ्या मृत्यूमुळे ती संपत्ती माझ्या चुलतभावाला मिळणार आहे.

**मृत्युंजय**—त्यामुळेच तुम्हाला हल्ली अपघात होताहेत असंच ना.

**दिगंबर**—काही विचारू नका. फारच भयंकर आणि चमत्कारिक प्रकार. माझ्यावर नुसती हल्ल्याची बरसात होतेय. अहो एकदा तर सबंध झाडच माझ्यावर कोसळलं.

**मोरू**—काय सबंध झाड ?

**दिगंबर**—सुदैवाने ते झाडंच मोडलं. पणं नंतर एक हातबॉम्ब चार हातांवर फुटला. तर एकदा भयंकर विषारी सर्प माझ्या अंथरुणात चिरडून मेला. त्यातून मी वाचलो. पण काल सकाळी मला शेवटी

अनुक्रमणिका




दुर्दैवाने गाठलेच. सकाळी मी अंथरुणातून उठून खाली जायला निघालो तर कुणी तरी जिनाच कापून टाकला होता.

**मोरू**—काय सबंध जिनाच कापून टाकला होता ?

**मृत्युंजय**—सबंध जिना ?

**दिगंबर**—होय. पण खाली कोसळल्यावर ते माझ्या लक्षात आलं.

**मृत्युंजय**—हा सारा प्रकार तुम्ही कुणाला सांगितला का ?

**दिगंबर**—पोलिसाना सांगितला.

**मृत्युंजय**—(हसत) मग नेहमीप्रमाणेच मूर्खपणाचा सल्ला मिळाला असणार तुम्हाला.

**दिगंबर**—होय. त्यांनी प्रथम तुमची गाठ घ्यायला सांगितले.

**मृत्युंजय**—( सावरून) अँ ! पोलिस केव्हापासून शहाणे झाले ? बरं आता शेवटचा पण महत्त्वाचा प्रश्न. काय हो दिगंबरपंत तुमचा खून करण्यात त्याचा आणखी काही हेतू ?

**दिगंबर**—नाही. त्याला काहीच मिळणार नाही. अर्थात् काकांची संपत्ती सोडून.

**मोरू**—बाबूजी एक शंका आहे. संपत्तीसाठीच खून करायचा असता तर दादा देशमुखांनी सरळ दिगंबरपंतांचाच केला असता, म्हणजे अनायासे संपत्ती पदरात पडली असती.

**मृत्युंजय**—मोरू हे प्रकरण दिसतं तितकं सोपं नाही. बरं दिगंबरपंत तुमच्याजवळ दादा देशमुखचा फोटो आहे का ?

**दिगंबर**—( खिशात हात घालीत ) होय. मी बरोबरच आणलाय तो. हं ! हा घ्या दादा देशमुखाचा फोटो !

**मृत्युंजय**—( फोटो घेऊन ) छान. फोटो जुना आहे. पण अंदाजापेक्षा तुमचा चुलतभाऊ तुमच्यापेक्षा फारच लहान वाटतो. पण काय हो दिगंबरपंत फोटोत तुमचे बंधू असे रांगतात कशाला ?

**दिगंबर**—( चकित होऊन ) आँ ! बघू फोटो. सॉरी हं ! साहेब घोटाळा झाला. हा फोटो मी सहा महिन्याचा होतो तेव्हाचा आहे. चुकून माझाच फोटो दिला मी तुम्हाला. हं ! हा घ्या माझ्या चुलतबंधूचा फोटो.

**दिगंबर**—( फोटो पहात ) शाब्बास ! हा फोटो फारच उपयोगी पडेल. मोरू मी माझ्या कामाला सुरुवात करतो. मी आत जाऊन येतो. तोपर्यंत तू यांच्याशी गप्पा मारीत बैस. लक्षात आलं ना ! (जातो).

**दिगंबर**—मृत्युंजयसाहेब आत कशाला गेले, मोरूसाहेब ?

**मोरू**—फॉर युवर इन्फर्मेशन. बाबूजी आता तुमच्या चुलतबंधूचे म्हणजे दादा देशमुखाचे वेषांतर करून येतील. वेषांतराच्या बाबतीत त्यांचा अगदी हातखंडा आहे. डिटेक्टिव्ह होण्यापूर्वी ते वेषभूषाकार होते नाटक कंपनीत.

**दिगंबर**—पण नुसते वेषांतर करून ते करणार काय ?

**मोरू**—ते आमचं ट्रेडसीक्रेट आहे. या कामी अत्यंत गुप्तता पाळावी लागते. पण फॉर युवर इन्फर्मेशन, मला वाटतं ते आता गुन्हेगारी अड्ड्यावर जातील व साऱ्या गुंडाना भेटतील. जर एखाद्या गुंडाने ओळख दाखवली तर तुमच्या चुलतबंधूचा गुंडाशी संबंध आहे हे सिद्ध होईल.



## नौजवान

दिशाहीन ही पहा जवानी नव्या मनूच्या स्वप्नांची
थोबाडावर कळा विलसते पंक्चरलेल्या चपलेची !
ओठावरती फिल्म शायरी चाल ट्विस्टच्या ठेक्याची
परीटघडीची तंग नेसणी जघने कटिका काड्यांची !
सुगंध तैलांकित रेशमी कुरळ्या तांबुस केसांची-
कोकिळ कोरी फॅशनवाली, नागिण वेडी भांगाची !
स्नो वरवटली घोटिव दाढी मिशील काडीमोड
मर्द म्हणवती कृती परंतु जनान्यातल्या बेगमची !
व्हिटॅमिनच्या खाऊन गोळ्या सुकडी झाली तनु
बॉलपेनची प्रतिकृति की शेंग जणू चवळीची !
रविकवींची नजर वाकडी वरती गॉगल हिरवा
मरव्याचा गारवा शोधती संताने मजनूची !
पिचके डोळे गालहि खप्पड नासिकाहि नकली
पानपट्टीची लाली ओकी धूम्रवर्तुळे जहराची !
रात्रंदिन समरांगण चाले मरणावर करवाढ
'पिपात मेले ओले उंदिर' रीत अशी जगण्याची !
रिस्टवॉच मनगटी बांधले गुलाम अन् ते त्याचे
जवानीत हे झाले बुढ्ढे मेली जिद्द मनीची !
आयुष्य अर्धे वाया गेले 'रांगा'मधून जाता
काळजात कळ लचकत् आली पाळी येता त्यांची !
हिरो हे झिरो अकलेचे पिक्चर है जिंदगी
बेकारी ही प्रेमनायिका दुनिया सारी व्हीलनची !
दिक्कालावर मानवतेच्या पहाट उगवे क्रांतीची
श्रीकृष्णा ये शिकवण द्याया पार्थाच्या या गीतेची

**–चंद्रशेखर लिगाडे**

**दिगंबर**—पण त्यामुळे साध्य काय होणार ?

**मोरू**—( गोंधळून ) अं–अ– म्हणजे त्याचं काय आहे– हे बघा ( तेवढ्यात फोन वाजतो ) सॉरी ! जरा फोन घेतो. हॅलो !

**आवाज**—अहो मला वाचवा !

**मोरू**—( फोन आदळून ) पुन्हा तीच मुर्ख बाई! कमाल झाली ( तेवढ्यात गुणा आत येते.)

**गुणा**—मोरूसायेब थोरलं सायेब कुठं हाईत ?

**मोरू**—मसणात—तुला काय करायचंय—काय काम आहे ?

**गुणा**—चिडता कावं सायेब ? अवं आपल्या सांडसाच्या पाइपावरून कोणतरी वर चढत येतंया.

**मोरू**—काय ?

**गुणा**—व्हय सायेब. म्या चेष्टा नाय करायची कंदी !

**मोरू**—अग खुळे तो ड्रेनेज इन्स्पेक्टर असेल.

**गुणा**—नाय सायेब त्यो भयंकर दिसतोया. दोन पिस्तुलं घेऊन वर चढतुया.











अनुक्रमणिका

**मोरू**—गुणा तू मुर्ख आहेस. अग हातात दोन पिस्तुलं घेऊन तो पाईप-वर कसा चढणार ?

**गुणा**—तसं नव्हं सायेब. पिस्तुलं त्यानं गळ्यात बांधल्यात.

**मोरू**—पिस्तुलं आणि गळयात ! कमाल हाय. गुणा, फॉर युवर इन्फर्मेशन, मी यांची नोंद घेतो. तू जाऊ शकतेस.

**गुणा**—बरं सायेब जात्ये मी. पर तुमी सावध असा. (जाते)

**मोरू**—पाहिलंत दिगंबर पंत या व्यवसायात आराम कसा तो नाही. तुम्ही बघताच आहात. अहो कधीकधी एकाला फासावर चढावावं तर दुसरा पुढे हजर ! हल्ली गुन्हेगारी फारच बोकाळ-लीय.

**दिगंबर**—( भावडेपणाने ) पण काय हो एकदम डझनभर डाकू तुमच्यापुढे आले तर तुम्ही काय करता ?

**मोरू**—( सहजपणे )—आँ ! आम्ही तिघा–तिघांचे बंडल बांधून टाकतो. तेच आम्हाला सोपं पडतं.

( तेवढ्यात गळ्यात व हातात पिस्तूल घेऊन दादा देशमुख प्रवेश करतो.)

**दादा**—खबरदार ! कुणी जागचा हलला तर चिंधड्या करून टाकीन. ( हंसतो ) हां ! हां ! माझ्या हातात–अन् गळ्यात पिस्तुल आहे आणि मी दादा देशमुख आहे. एकेकाचा मुडदा पडेल. (दिगूस) —शेवटी सापडला.

**दिगंबर**—पण–प–पण मी तुझा भाऊ—

**दादा**—खामोश ! तुझा काटा काढला की सारी दौलत माझी. ( हंसतो. ) लाखोपती ! हां ! हां ! (' मोरूस ) हा मरतुकडा कोण ? काय रे झुरळा !

**मोरू**—मी–मी झुरळ–आपलं मोरू–म–मोरू सुप्रसिद्ध–

**दादा**—चूप ! आवाज नाय पायजेल. दोघेही हात वर करा. (हात वर करतात ) आता दोघेही पाय वर करा !

**मोरू**—प–पण ते कसं शक्य आहे?—

**दादा**—बरं नुसतेच हात वर करा. नायतर फुकट मराल.

**मोरू**—( झटका बसावा तसा मोठ्याने हसू लागतो ). हां ! हां !

**दिगंबर**—हे बघ दादा आज तुझं खरं स्वरुप प्रकट झालं—

( मोठ मोठ्याने हसू लागतो. ) अरे तुम्हाला हसायला काय झालं?

**दादा**– ऐ झुरळा– उगा मिशा फेंदारू नकोस.

**मोरू**—( हंसत ) अहो, दिगंबरपंत, तुमची तर अगदी, कमाल झाली. तुम्हाला आमच्या बाबूजीनी मामा केलेत मामा.- (हसू लागतो.

**दादा**—ये माकडा, हंसण बंद. नाय तर—

**मोरू**—( हसत )— दिगंबरपंत–असे घाबरता काय. अहो हे काय तुमचे चुलते दादा देशमुख नव्हेत. हे आहेत आमचे **बाबूजी** – वेषांतर केलेले मृत्युंजयसाहेब! बाकी बाबूजी तुम्हारा भी जवाब नही. मी सुद्धा आधी फसलो.

**दिगंबर**—काय म्हणता ! म्हणजे हा खरा दादा देशमुख नाही—

**मोरू**—अगदी छातीवर हात ठेवून सांगतो. हे आमचे सुप्रसिद्ध डिटेक्टिव्ह मृत्युंजय !

**दादा**—ये माकडा—कुणाला डिटेक्टिव्ह करतोस.

**दिगंबर**—अशक्य ! माझा तर विश्वासच बसत नाही.

**मोरू**—मी तुम्हाला सांगितलं ना वेषांतराच्या बाबतीत आमच्या बाबूजींचा हातखंडा आहे म्हणून.

**दिगंबर**—( गोंधळून ) परंतु तोच चेहरा, तीच उंची, तोच रंग, तोच आवाज, तीच ढब, मी स्वप्नात तर नाही ना ?

**मोरू**—अहो हीच तर आमची स्पेशालिटी! हुबेहूब म्हणजे हुबे-हूब !

**दिगंबर**—माझी तर बोबडीच वळली होती.

**दादा**—बस्स् झालं हे नाटक. कसला तरी डाव खेळू नका माझ्याशी. अशानी फसणार नाय मी. आडीबाजी केलीत तर नाहक मराल.

**मोरू**—बाबूजी आता चेष्टा पुरे. ठेवा ते पिस्तुल खाली. बाकी आपण मानतो तुम्हाला.

**दादा**—काय रे तुला वेडबिड तर लागलं नाही की मीच पुन्हा वेड्यांच्या इस्पितळात आलोय !

**मोरू**—काय बेमालूम बनवलंत बाबूजी !

**दिगंबर**—दादा देशमुखाची जिवंत कॉपी ! नुसता फोटो पाहून एवढं वेषांतर म्हणजे कमाल !

**दादा** —(भानावर येऊन) हा काय प्रकार आहे ? कसलं वेषांतर ? कोण मृत्युंजय ? ( स्वगत )— अरे हां, मघाशी खोटया मिशा लावून आत भेटलेला तो विदुषक चक्क मृत्यंजय तर नाही ना ! एक फाईट बसताच कोसळला. शेवटी त्याला आतल्या फडताळात कोंबला अन् त्याचं हे पिस्तुल घेऊन आलो तर हे दोन वेडे भेटले.

**मोरू**—बाबूजी जोक तर मस्त केलात.

**दिगंबर**—खरंच, तुम्ही फारच विनोदी आहात बुवा.

**दादा**—म्हणजे त्यानं माझं वेषांतर केलं होतं तर ?

**मोरू**—बाबूजी आता फार ताणण्यात अर्थ नाही. अहो वेषांतर तुम्ही केलंय–यांच्या चुलत बंधूचं.

**दादा** —( सारा प्रकार कळून)—हां हां ! आता प्रकाश पडला. म्हणजे तुम्हाला असे वाटतंय की मी तुमचा बाबूजी असून त्यानं माझं वेषांतर केलंय. परंतु मी तुमच्या पुढे मात्र असं भासवतोय की मी तो आहे ज्याचं वेषांतर मी केलंय.

**मोरू**—अगदी बरोबर.

**दिगंबर**—एक अक्षर कळलं असेल तर शपथ.

**मोरू**—पण मला कळलं ना.

**दिगंबर**—काही हरकत नाही. तुमची इच्छाच असेल तर मी तुमचाच बाबूजी आहे बस्. झालं समाधान ?

**मोरू**—ते मी केव्हाच ओळखलं होतं.

**दादा**—शाब्बास ! तू हुशार आहेस.

**दिगंबर**—बाकी चांगलीच करमणूक झाली.

अनुक्रमणिका






**दादा**—वरं, मोरू महत्त्वाची गोष्ट म्हणजे मी आत जाऊन पाईपावरून चढणाऱ्या त्या इसमाला मी पकडला.

**मोरू**—पकडला. वरं झालं. मी तेच तुम्हाला सांगणार होतो. गुणानं पाहिला होता त्याला चढताना.

**दादा**—कोण गुणा ? आपलं – तो– तो फारच भयंकर आहे. त्याला आपल्या फडताळात कोंबून आलोय.

**मोरू**— तुम्ही तर अगदी कमाल करता बाबूजी.

**दिगंबर**—ह्याला म्हणतात धाडस !

**दादा**—पण आपल्याला सावध राहिलं पाहिजे. तो अट्टल बदमाश आहे. तुम्ही दोघांनी त्याच्यावर पाळत ठेवली पाहिजे. तो पळून जाता कामा नये. त्याचा आपल्याला फार उपयोग होणार आहे.

**दिगंबर**—साहेब , मग तावडतोब पोलिसाना बोलवा.

**दादा**—पोलिसांना कळता कामा नये. घोटाळा होईल. आपणच त्याच्यावर पहारा ठेवला पाहिजे.

**मोरू**—बाबूजी, तुम्ही काळजी करू नका. आम्ही दोघेही आळीपाळीनं ते काम करू.

**दादा**—त्याला इलाज नाही. मला अजून बरेच धागे-दोरे जुळवायचे आहेत. हे काम तुम्हाला दोघानाच करावं लागणार.

**दिगंबर**—आम्ही डोळचात तेल घालून पहारा करतो साहेब.

**मृत्युंजय**—पण सावध रहा. मला आता वेळ नाही. चल मोरू मी तुम्हाला आतील ते फडताळ दाखवतो. तुम्ही पहारा करा तेवढचात मी बाहेरून जाऊन येतो.

**मोरू**—चला बाबूजी, आम्ही केव्हाच तयार आहो.

**दादा**—चला दिगंबरपंत. घाबरू नका. मी आसपास आहेच. चला. (दोघेही आत जातात.)

( काही वेळानं दादा देशमुख हातात पिस्तुल घेऊन परत येतो. याबेळी गुणा आत आलेली असते.)

**दादा**—मूर्ख लेकाचे ! मला बनवताहेत. पोरखेळ वाटला त्यांना. तिघानाही फडताळात कोंबून आलो. नांवाचा दादा देशमुख आहे म्हणावं. आता राहिली ती मोलकरीण तेवढी. तिनं मला पाहिलं आहे काय ? तिचं तोंड कायमचंच बंद करतो. ( तेवढचात गुणाचं लक्ष जातं.)

**गुणा**—कोण ? कोण पायजेल तुमास्नी. सायेब आमंदी गेल्यात.

**दादा**—(चमकून) कोण ? मोलकरीण–खबरदार ओरडशील तर. मुकाट्यानं हात वर कर. दिसायला चांगली असलीस तरी तुला सोडणार नाही.

**गुणा**—या बया, आक्रीतच हाय. अवं पर तुमी कोन? बघितल्यासारखं वाटतंया. हे बगा सायेब तुम्ही कुणी का असाना. म्या मोलकरीन हाय. उगां मला गरीबाला कां मारता ? म्यां काय गुन्हा केला तुमचा—

**दादा**—( पिस्तुल रोखीत ) आधी आतल्या खोलीत चल मग दाखवतो तुला.

**गुणा**—आमंदी कशाला व ?

**दादा**—( हसतो) घाबरू नकोस. दुसरं काही करणार नाही. पण तुला फडताळात बसावं लागेल. त्या तीन मूर्खांच्या बरोबर.

**गुणा**—पण मला फडताळात कोंबून काय करणार तुमी ?

**दादा**—(हसतो ) या घराला आग लावून देणार. सारा पुरावाच नष्ट करणार. चल मला वेळ नाही. अजून खूप गोष्टी करायच्यात मला. आटप नाहीतर मला जबरदस्ती करावी लागेल.

**गुणा**—म्यां साफ येनार नाय. म्या काय तुमची मोलकरीन नाय. आन् मला ते जमायचंबी नाय—

**दादा**—काय जमणार नाही ?

**गुणा**—एकाच फडताळात—तिघांच्याबरुबर—

**दादा**—माझा नाईलाज आहे कारण फडताळ एकच आहे. चल नाहीतर—(पिस्तुल रोखतो.)

**गुणा**—म्यां तुमच्या जागी असते तर अशी वागली नसती.

**दादा**—उगाच वेळ घेऊ नकोस. माझ्याशी गाठ आहे.

**गुणा**—तुमचीबी माझ्याशी गाठ हाय. म्याबी मोठ्या डिक्टेरची मोलकरीन हाय घा वर्स. तुमच्या सारखं हजार मवाली बघितल्यात म्या.

**दादा**—म्हणजे तुला ह्या पिस्तुलानंच मरायचंय तर. मग हो तयार–

**गुणा**—तुमची काय ताकद हाय मला मारायची. आन् तेबी तुमच्या मागच्या खिडकीत पोलिस उभा असताना—

**दादा**—( घाबरून मागे वळतो ) काय ? पोलिस ? ( हातातून पिस्तुल गळते ते गुणा उचलते व त्याच्यावर रोखते.)

**गुणा**—हात वर करा सायेब. आन् जरा लांब उभं ऱ्हावा. पोलिस नाय ना काय नाय. तुमच्या हातातलं पिस्तुल काढायचं होतं मला. बाकी जुनीच युगत कामाला आली शेवटी. तुमी या धंद्यात अगदी नवं दिसताया.




**"आई, सिनेमासारखं 'असलया' बसला पण 'ए' सर्टिफिकेट असतं ssss?"**

अनुक्रमणिका

**दादा**—(थंडपणे) असं फसवलंस काय. पण ते पिस्तुल रिकामं हाय.
**गुणा**—रिकामं हाय. आमच्या सायबाचं तर दिसतंया. बघा म्यां, चाप ओढते. ( आवाज होतो ) बघा भरलेलं हाय. वरं झालं म्यां हवेत बार काढला. नायतर आता तुमचा—
**दादा**—( घाबरून ) गुणाबाई— गुणाबाई— मी चूक केली. मला माफ कर. तू आता माझं काय करणार आहेस. कृपा करून ते पिस्तूल फेकून दे.
**गुणा**—आंदी त्या तीन माणसांना बाहेर काढा. नायतर चाप ओढलाच बघा म्या—
**दादा**—नाही. नाही. तेवढं करायला सांगू नकोस. मी त्यांच्या हातात सापडलो की माझा सर्वनाश.
**गुणा**—अगदी बराबर वळखलंत सायेब. पण चाप—
**दादा**—नको गुणा. मी तुझ्या पाया पडतो. तेवढा चाप ओढू नकोस. मला सोडून दे —वाटल्यास माझी अर्धी दौलत घे. सारी पाहिजे तर सारी देतो. पण—
**गुणा**—मला व गरीबाला पैका कशाला. आमच्या सायबास्नी सोडा मुकाट्यानं नायतर—
**दादा**—बाई तुमाला माहीत नाही मी त्यांच्या हातात गेलो तर—
**गुणा**—ते मला नगा सांगू. आंदी ते फळताळ खोला नायतर फुकाट मराल बघा. चला व्हा पुढं. म्यां तुमच्या मागं हायीच.
**दादा**—( पुढे चालत ). जशी तुझी मर्जी. पण मला मारू नकोस.
**गुणा**—चला बघू आमंदी. मंग बघू मारायचं—

( दोघेही आत जातात. जरा वेळानं दार उघडल्याचा आवाज. नंतर मृत्युंजय, मोरू, गुणा, दिगंबर. व दादा येतात. दादाचे हात बांधलले आहेत. )

**मृत्युंजय**—दादासाहेब खेळ आटोपला तुमचा. माझ्या हातून आणि केलेल्या गुन्ह्यातून माणूस सुटणं शक्य नाही. दिगंबरपंत तुमची काळजी मिटली आता.
**दिगंबर**—तुमच्या गुणाबाई होत्या म्हणून वाचलो. ( मृत्युंजय व मोरू चमकतात. )
**मोरू**—बाबूजीनी ते ओळखलंच होतं. नाही का बाबूजी?
**दिगंबर**—त्याचं काय आहे गुणा—

## ‘कादंबरीके’साठी रौप्य-पदक

‘दीपावली’च्या रौप्य-महोत्सवी वर्षात (मार्च १९६९ ते फेब्रुवारी १९७०) ‘कादंबरीका’ प्रसिद्ध करण्यात येणार आहेत. त्या एकाच अंकात प्रसिद्ध होणार नाहीत. त्यामुळे या कादंबरिकांपैकी सर्वोत्कृष्ट कादंबरिका कोणती या बाबत वाचकाचे मत वर्ष अखेरीला प्रसिद्ध होणाऱ्या खास ‘कूपन’-द्वारेच अजमाविण्यात येईल आणि वाचकांनी अग्रमान दिलेल्या ‘कादंबरीके’च्या लेखकाला ‘रौप्य-पदक’ देण्यात येईल.

— संपादक

**गुणा**—म्या कायबी केलं नाय. आमचं सायेबच हुशार.
**मृत्युंजय**—दादासाहेब तुम्ही तुमच्या काकांच्या खुनाला जबाबदार आहात. त्याचबरोबर माझ्या खुनाचाही तुम्ही प्रयत्न केलात. माझे अंदाज कधीच चुकत नाहीत. तुमचे दिवस भरले आता. पुढील काम पोलीस करतील. मोरू, पोलिसांना फोन कर.
**गुणा**—म्यां आंदीच फोन केलाय सायेब—पोलिसांना. ( सायरनचा आवाज येतो. ) आलंच वाटतं पोलीस.
**मृत्युंजय**—ते मी ओळखलंच होतं. काही हरकत नाही. गुणा ह्या बदमाशाला पोलिसांच्या ताब्यात दे. जा घेऊन त्याला, पण सावध हं.
**गुणा**—त्याची काय काळजी करू नगा सायब. माझ्याशी गाठ हाय म्हणावं. (दादाला घेऊन गुणा जाताना) जाते मी सायब. (जाते.)
**मृत्युंजय**—काय दिगंबरपंत आता खूष आहात ना. अखेर खुनी कोण होता हे तुम्हाला कळलं ना. माझे अंदाज कधीच चुकत नाहीत.
**दिगंबर**—तुम्ही तर कमाल केलीत साहेब. आपण तर चाटच झालो.
**मोरू**—काही म्हणा, पण तुमची गुन्हा शोधण्याची पद्धत काही औरच आहे बाबूजी. मला दिगंबर पंताचा संशय येत होता.
**मृत्युंजय**—मोरू तू अजून बच्चा आहेस.त्यासाठी माणसाच्या स्वभावाचा बारीक अभ्यास हवा. आता हेच बघा. मघाशी मी वेषांतर करून त्याच्यासमोर गेलो–त्याचबरोबर तो भयंकर खचला. भयंकर संतापला. कारण मी त्याचंच मूर्तीमंत पाप त्याच्या समोर उभं केलं. माणसाला आपण केलेल्या गुप्त गोष्टीबद्दल काही वाटत नाही, पण तीच गोष्ट इतरांना कळली की तो फार अस्वस्थ होतो. एकदा का तो खुनी आहे हे त्याला कळलं की मग खुनाला आपोआप वाचा फुटते.
**दिगंबर**—साहेब तुम्ही ग्रेट आहात. तुमची फी म्हणून गेल्या गेल्या कोरा चेक पाठवून देतो. अच्छा मोरोपंत तुमची फारच मदत झाली. त्रास दिल्याबद्दल—
**मोरू**—छे छे ! त्रास कसला. हा आमचा व्यवसायच आहे. अर्थात यशाचं सारं श्रेय आमच्या बाबूजीना आहे.
**दिगंबर**—तुमची गुणा होती म्हणून बरं झालं. नाही तर–अच्छा येतो मी. (जातो.) (तेवढ्यात फोन वाजतो.)
**मृत्युंजय**—(फोन घेवून) हॅलो ! मी मृत्युंजय बोलतोय–काय–
**आवाज**—अहो मला वाचवा.
**मृत्युंजय**—पण बाई कृपा करून आपला पत्ता सांगा ना. घाबरू नका ! मी डिटेक्टिव्ह मृत्युंजय बोलतोय. ( फोनमधून विचित्र आवाजाचा गोंधळ ऐकू येतो. ) हां हां अस्स ! तुमचं घर हत्यारबंद दरोडेखोरानी वेढलंय काय — मशीनगनचा मारा करताहेत. मदत पाहिजे— अच्छा–अच्छा ! काळजी करू नका. तावडतोब मदत पाठवून देतो— सॉरी– मला येता येणार नाही. आताच मी एक केस हातावेगळी केली. अच्छा. दॅटस् ऑल राइट ! ( फोन खाली ठेवतो. ) अग गुणा ! ए गुणा !
**गुणा**—( प्रवेशून ) काय झालं सायेब. त्या बदमाशाला म्यां पोलिसाच्या हवाली केला सायेब. पोलिस त्याला घेऊन गेले सायेब.

(पृष्ठ ४४ वर पहा)








अनुक्रमणिका










# धोतर कोचिंग क्लासेस

प्रा. रमेश देगांवकर

बन्यानं आयडिया सांगितली तेव्हा मी अगदी चाटच पडलो. बन्याला लेकाला कशा आयडिया सुचतात कुणास ठाऊक—रोज नवीन काहीतरी त्याच्या डोक्यात असतं. पण यावेळची आयडिया म्हणजे काय—अगदी भलतीच होती. बन्याला बुद्धी देणाऱ्या ब्रम्हदेवालाही सुचली नसती, असं निदान मला तरी वाटलं.

बन्या म्हणाला—बन्या म्हणजे माझा दोस्त, तो म्हणाला, "चित्या चल, एक काम आहे, तुझ्याशी डिस्कस करायचंय्."

बन्याचं एक वैशिष्टच आहे. तो कोणतीही कल्पना प्रथम माझ्याशी डिस्कस करतो. अन् मग मी संमती दिल्यावर कामाला लागतो. मी संमती देतच असतो, कारण मी संमति दिली नाही तरी बन्या आयडिया सोडतच नाही—एवढंच नव्हे, तर ती राबविण्यासाठी मला खेचल्याशिवाय रहात नाही.

महत्त्वाचं डिस्कशन असलं म्हंजे बन्या न् मी कोपऱ्यावरच्या 'चंद्रविलास' हॉटेलमध्ये जात असतो. एकतर तिथे भजी चांगली बनतात अन् दुसरं म्हणजे कितीही उधारी झाली तरी मालक पैसे मागत नाही. ( दुसरा मुद्दाच जास्त महत्त्वाचा. )

पण आज चंद्रविलासकडे न वळता बन्या हॅण्डलूम दुकानाकडे वळला तेव्हा मी थक्कच झालो.

"अरे, इकडे कुणीकडे?"

"चल रे, तुला काय करायचंय," बन्यानं ओढतच मला हॅण्डलूम दुकानाकडे नेलं. दुकानासमोर आल्यावर बन्या थांबला, अन् शो–केसकडे बोट दाखवून म्हणाला,

"हे पाह्यलंस्? तुझं काय मत आहे ?" शोकेसमध्ये मॉडेल होतं-स्त्रीचं–अर्थात साडी नेसवलेलं.

"माझं काय मत आहे ? म्हणजे ?"

"म्हणजे असं. . .बरं ते जाऊ दे – अशा मॉडेलला खर्चं किती येईल ?"

"अरे पण करायचंय् काय मॉडेल घेऊन तुला ? हे पहा बन्या, माझा आपला तुला क्लीअर सल्ला. तू चक्क लग्न कर तावडतोब. हा आंबटशौक पुरे."

"गाढव आहेस, चित्या . .

मला गाढव म्हणण्याचा अधिकार कुणाच्याही बापाला नाही ( अगदी माझ्या सुद्धा ) पण बन्याला मात्र आहे.

मला अशा रीतीने गाढवपदी बसवून बन्या म्हणाला, " अरे, असं मॉडेल बनवायचं अन् त्याला धोतर नेसवायचं."

"काय, म्हणतोस काय ? साडीच्या ऐवजी धोतर नेसवायचं–बन्या–निव्वळ शतमूर्ख आहेस."

बन्याला शतमूर्ख म्हणायचा अधिकारही मला एकटयालाच पोचतो. पण विशेष असं की शतमूर्ख म्हटलं तरी बन्याला त्याचं काहीच वाटत नाही—

मी काहीच म्हणालो नाही या थाटात बन्या पुढे म्हणाला,

"हत् लेका, तुला साल्या सारं सांगितल्याशिवाय काही कळतच नाही–" अन् मग आम्ही दोघेही चंद्रविलासकडे निघालो.

चंद्रविलासमध्ये आम्ही गेल्याबरोबर न सांगता वेटरनं भजी आणून ठेवली. पण बन्याचं आज भजी खाण्यात अजिबात लक्ष नव्हतं. मी भजी खात होतो. अन् बन्या बोलत होता.

"हे पहा, आपण दोघे मिळून धोतर कोचिंग क्लासेस. . . .

बन्याचं वाक्य पूर्ण व्हायच्या आतच मी ओरडलो—"काय ?" म्हणून, पण एकदम घशात भजं अडकलं—माझा जीव कासावीस झाला



अनुक्रमणिका

बन्यानं पाण्याचा ग्लास माझ्या तोंडापुढं धरला—मी पाण्याचा घोट घेईपर्यंतच बन्यानं सुरुवात केली.

"हे बघं—चित्या, असा घाबरतोयस काय ? आपल्या भारतीय संस्कृतीत धोतर किती महत्त्वाचंय्, नाही का ? भारत भारत म्हणतात तो धोतरामुळंच ओळखू येतो. आता तूच सांग वरचेवर आपल्या देशातले लोक धोतरं सोडताहेत—नाही म्हणजे–पॅण्टस् बुशशर्टस् वापरताहेत—घाबरू नकोस, मी काही अश्लील बोललो नाही. तर काही दिवसानी धोरत नाहीसंच झालं म्हणजे ? आपल्या भारताची परंपरा, संस्कृती तत्त्वज्ञान, धर्म आणि. .आणि. आणि काय वरं—ते जाऊ दे. . .सारं काही लयास जाईल–तेव्हा अरे पण तू भजी कां खात नाहीस?"

बन्या बोलत होता तेव्हा मी आ वासून त्याच्याकडे पहात होतो. हे बन्याच्या प्रश्नानं माझ्या लक्षात आलं. मी भजं तोंडात टाकीत आणि गंभीर चेहरा करून सीरियसली म्हणालो,

. 'बन्या, हे सारं खरं आहे—पण हे लयास जाणं आपण कसं काय स्टॉप करणार ?"

"आपण काय करणार ? चित्या हा हा पळपुटेपणा. . आपण भारताचे आधारस्तंभ नसलो तरी आधारकाटक्या नक्कीच आहोत. आपण धोतर टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ( बन्या एखाद्या संघवाल्याच्या आवेशात बोलत होता. मला जरा भीतीच वाटू लागली. ) माझी तर खात्रीच झालीय् की धोतरामुळेच देशाचं कल्याण होणार आहे. उगाच का रामदास म्हणाले, 'धोतरानेच होत असते रे, आधी नेसलेचि पाहिजे.' मी तर प्रतिज्ञाच केलीय्. . . ."

"बन्या–बन्या थांब–हे फार होतंय् " मी भजं बाजूला ठेवीत म्हणालो. कारण बन्यानं आतापर्यंत अनेक प्रतिज्ञा केल्या होत्या–अन्. . .अर्थातच एकही पूर्ण झाली नव्हती.

"फार काय होतंय् ? यावेळची माझी प्रतिज्ञा म्हणजे अगदी प्रतिज्ञाच आहे. . .नेसेन तर धोतर. "

बन्या हे वाक्य एवढ्या आवेशात म्हणत होता–हॉटेलमधला प्रत्येक माणूस–गिऱ्हाईकांसकट बन्याकडे पाहत होता—एकदम मी ओरडलो.

"बन्या–स्टॉप-ईट. अश्लील होऊ लागलंय् हे."

"काही अश्लील नाही. धोतरात काय अश्लील आहे ? धोतर नेसणे माझा जन्मसिद्ध हक्कच आहे." एवढे म्हणून बन्या गंभीर झाला—बन्या गंभीर झाला की मला त्याला खुशाल बोलू देत असतो. अगदी सावकाश तो म्हणाला, "चित्या, काही म्हण, माझी तर खात्री झालीय्–परमेश्वराने या देशात मला धोतरं ठेवण्यासाठीच जन्माला घातलंय्."

प्रत्येक नवीन आयडियांच्या वेळी बन्या गंभीर होत असतो अन् परमेश्वराने त्याला .यासाठीच जन्माला घातले असं म्हणत असतो. (हे मला माहीत आहे पण सूज्ञ व असूज्ञ वाचकांपैकी कोणालाच माहीत नसल्याने येथे लिहिले आहे)– बन्या बोलतच होता.

---

**'भारताची अस्मिता जागृत ठेवण्यासाठी धोतर नेसण्यास शिका'—'मॅन ॲण्ड चिंटो' कंपनीचे हे वाक्य आणि 'नेसा, नेसा, धोतर नेसा' तसेच नेसो' या घोषणा शेवटी धूळ खात कां पडल्या ?—**

---

"चित्या — आपली नवीन घोषणा—नसके रहेंगे—नेसके रहेंगे—धोतर नेसकेच रहेंगे ।"

"बन्या, ते ठीकय्—पण समजा तू न् मी कोचिंग क्लासेसना सुरुवात केली—तर येणार कोण ? लोकांना हल्ली धोतरं आवडत नाहीत."

"आवडता नही–बोले तो क्या ? आवडनाच पडेगा."

बन्या—राष्ट्रभाषेत शिरला तेव्हाच माझ्या लक्षात आलं की, बन्यानं आयडिया सीरियस घेतलीय् – अन् बन्याच्या कल्पनेला नेहमीप्रमाणे मी बळी पडलो. आम्ही जय्यत तयारी केली—जागा घेतली—क्लासेसचे दरपत्रक तयार केले. नियम ठरविले. गावात पोस्टर्स लावले—आमचं पोस्टर होतं—

"मॅन ॲण्ड चिटो धोतर कोचिंग क्लासेस"

नेसा–नेसा–नेसा धोतर नेसा.

नेसो–नेसो–नेसो धोतर नेसो.

भारताची अस्मिता जागृत ठेवण्यासाठी धोतर नेसण्यास शिका.

* एक महिन्याचा कोर्स.
* धोतराचे विविध प्रकार.
* वैयक्तिक लक्ष, माफक दर.

"मॅन ॲण्ड चिटो" हेही बन्याचं डोकं होतं हे आतापर्यंत तुमच्या लक्षात आलं असेलच. बन्याचं डोकं नेहमी ओरीजिनल चालतं. आम्ही आपले कार्बन कॉप्या काढतो. 'मानकापे' ( हे बन्याचं आडनाव ) मधल्या 'मान'चं त्यानं मॅन केलं, अन् चितूचं 'चिटो' तो म्हणाला, तांबेचं टॉम ॲण्ड बे होतं. मग आपल्याला काय हरकतय् ?

आमचे दर खरोखरीच माफक होते. डबलकाष्टा धोतर–वीस रुपये, सिंगलकाष्टा धोतर पंधरा, लुंगी–दहा, बंगाली–तेरा. दोन पद्धती शिकणाऱ्यास तीन रुपये सवलत.

'पंचा'ही यात घालावा असं मी बन्याला सुचवलं पण 'पंचा नेसायला काय अक्कल लागते' असं म्हणून बन्यानं माझी सूचना सरळ धुडकावली. आणि मी पंचाचा नाद सोडला.

एक भव्य जागा घेऊन आम्ही क्लासेसना सुरुवात केली. आणि मग कुठं बन्याची मॉडेलची आयडिया माझ्या लक्षात आली. आम्ही एक शो–केस तयार केली अन् त्यात मॉडेल ठेवलं–धोतर नेसवलेलं—अर्थात् पुरुषाचं.

आमच्या क्लासेसना चांगलीच गर्दी झाली. सुरुवातीला आम्ही दुकानदाराकडून उधार धोतरं आणली. पण विद्यार्थ्यांना शिकवताना आम्ही दम देत असू–"घरी थोडीशी प्रॅक्टिस करा. इथला वेळ अपुराच आहे." त्यामुळे आणि काही जणांना धोतराची. चटकच लागली, त्यामुळे आमच्या धोतरेच्छू विद्यार्थ्यांनी धोतरे विकत

आणली. धोतरांचा मोठ्या प्रमाणात खप झाल्यामुळे दुकानदारानी बन्याला धोतराचे पैसे माफ केले. एवढेच नव्हे तर त्यांनी बन्याचा सत्कार घडवून आणला. याच सत्कारसमारंभात बन्याचा 'धोतर-महर्षि' झाला.

धोतरमहर्षि मानकापे व मी मिळून एक परिसंवाद आयोजित केला. धोतर एककच्छ की द्विकच्छ (सिंगलकाष्टा की डबलकाष्टा असं बन्याचं म्हणणं, पण मला इंग्रजी आवडत नाही—त्यामुळे मी 'कच्छ' पसंत केलं.)

या परिसंवादाचं अध्यक्षस्थान स्वीकारलं होतं कानफाट्या मारुतीचे पुजारी श्री. बाबुबुवा यांनी. त्यांनाच अध्यक्षपद देणं योग्य असं बन्याचं मत. कारण दिवसाचे संपूर्ण वेळ तरी ते धोतर नेसून रहात. ( रात्रीचं आम्हास मोहीत नाही. )

परिसंवादातील वक्ते होते—टोणपे मास्तर, आ. गणपतराव पाटील, विनोद भैय्या, आणि अर्थातच बन्या मानकापे. टोणपे मास्तर हे एका शाळेत संस्कृतचे मास्तर होते. ते स्वतः पॅन्ट-बुशशर्ट घालत पण त्यांना धोतराचा अभिमान होता. बन्याचं प्रास्ताविक झाल्यावर टोणपे मास्तर बोलावयास उठले. ते म्हणाले, "धोतर महर्षि मानकापे यांनी एक महत्त्वाचा प्रश्न हाती घेतल्याबद्दल मी त्यांचं मनःपूर्वक अभिनंदन करतो. माझ्या दृष्टीने एककच्छ की द्विकच्छ हा प्रश्न फारसा महत्त्वाचा नाही. मुळात धोतर टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः । या नात्याने द्विकच्छवादी मंडळींना मी विनंती करतो की त्यांनी या प्रश्नावर फारसा घोळ घालू नये. धोतराचा समूळ नाश होण्याची वेळ आली असता एक कासोटा, दोन कासोटे यावर चर्चा करण्यात अर्थंच काय ? मी तर म्हणतो कासोटा नसला तरी चालेल पण धोतर पाहिजे. अहो धोतर सलामत तर कासोटे पचास. तेव्हा या 'कच्छ'वर फारसं रण माजवू नये. (आपण केलेल्या कोटीवर खूष होऊन मास्तर स्वतःच हसले. बाकी फारसा प्रतिसाद मिळाला नाही.) तेव्हा दोन कासोटेवाल्यांनी एखादा कासोटा सोडण्यास हरकत नाही—नाहीतर कासोटे सोडण्यासाठीच असतात ( इथं लोक हसले ) माफ करा मी काही अश्लील बोललो नाही. तात्पर्य एवढंच की धोतर टिकविलंच पाहिजे. (श्रोत्यातून-ओरडले—तूमचं स्वतःचं काय ?) आम्ही घाबरलो— म्हणजे बन्या—आम्हाला वाटलं आता गोंधळ होणार—पण टोणपे [illegible] चिडले नाहीत ते म्हणाले, "थांबा—मी आजच सर्वांसमोर [illegible] करतो की उद्यापासून नव्हे अगदी आत्तापासून धोतर ने[illegible] सुरुवात करीत आहे." असे म्हणत मास्तरांनी चक्क स्टेजवर [illegible] काढली—आम्ही गांगरून जाऊन त्यांच्याकडे पहातो तो आ[illegible] लक्षात आलं की मास्तरांनी आतून डबलकाष्टा धोतर नेस[illegible] व ते दुमडून वर खेचून घेतलं होतं—त्यांनी वरती दुमडलेलं [illegible] खाली सोडली व कमरेवर हात ठेवून ओरडले आता बोला—काय बोलणार? मास्तरांची पूर्वतयारी पाहून आम्हाला तर [illegible] धन्यता वाटली. त्यांच्या वस्त्रहरणाने – चुकलो, वस्त्रवद[illegible] आमची अब्रू वचावली होती. आम्ही ओरडलो, "धोतररत्न [illegible] मास्तरांचा विजय असो."

थोडीशी शांतता झाल्यावर आ. श्री. गणपतराव [illegible] ढाकेफळकर बोलावयास उठले. श्री. पाटील हे ढाकेफळचे—ते [illegible] नेहमीच धोतर नेसत. त्यांनी यशवंतराव चव्हाणांची स्टाईल [illegible] अलीकडे उचलली होती. ते म्हणाले, सन्माननीय सद[illegible] ( अॅसेम्ब्लीत त्याना बोलायची सवय असल्याने ते नेहमीच सुरुवात करीत)—लोकहो, मला आज लई आनंद झाला हाय. [illegible] पहिल्यापासून धोतरंच नेसतो. माझ्या पोराला बी म्या जन्म[illegible] पासून धोतरच नेशिवलो. त्यो आता कालिजात असतो—पन् [illegible] यतो तवा धोतरच नेसतो.

आपले भारताचे लाडके संवरक्षण मंत्री यशवंतरावसा[illegible] त्ये बी ( अहो ते आता गृहमंत्री आहेत—काही चावट श्रो[illegible] हॉ—हॉ असतील संवरक्षणमंत्री— काय अन् ग्रह मंत्री काय महत्त्वाचं नाही. म्या सांगतोय की ते बी धोतर नेसतात, ह्ये मा[illegible] पॉईंट हाय—ते धोतर नेसत्यात ह्ये मी पर्त्यक्ष पाह्यलंय्—म[illegible] घरी ते आलतं—तवा म्या त्यांचं धोतर धुलो होतो—तवा उग[illegible] नेहरूंनी त्येस्नी बोलिवलं—धोतर नेसणारा मनुक्ष लई शूर अ[illegible] आता ह्येच बघा. साह्येब दिल्लीला गेलं अन् चीन पाक पळ[illegible] तवा समद्यांनी धोतर नेसलंच फायजे—म्या तर सीयमशी (म[illegible] मुख्य मंत्री हे वाचकांच्या ध्यानात येईलच ) डिस्कस करून—[illegible] मायला—ठरावच मांडतो अॅसेम्ब्लीत. आता ह्यो जो प्रश्न ह[illegible] एककच्छ का काय ते—त्येच्यावर म्या बोलू शकत न्हाय कारण [illegible] कच्छवर काईबी बोलायचं न्हाय असा पार्टीचा आदेश हाय."

अध्यक्षांच्या विनंतीवरून विनोदभैय्या बोलायला उठले. [illegible] कोणताही असो—त्याला विरोध करायचा हे त्यांचं धोरण अस[illegible] ते म्हणाले, "धोतर बितर सब झूट आहे. धोतरात काय अन् [illegible] मध्ये काय ? ( लोक हसले—विनोद भैय्यानी सोयीस्करपणे [illegible] केलं) म्हणजे दोन्ही कपडेच की—पण धोतर हे प्रतिग[illegible] पणाचं लक्षण आहे. अमेरिका चंद्रावर चाललीय् अन् आपण [illegible]

नेसतो. धोतराशी माझे तीव्र मतभेद आहेत. ( विनोदभैय्याना पुढा-ऱ्यांशी मतभेद व्यक्त करण्याची सवय आहे. त्यामुळे ते हे बोलून गेले—"झांशीच्या राणी"वर बोलताना तात्या टोपेंशी मतभेद झाल्याचं त्यांनी सांगितलं ) तेव्हा मुळात धोतरच नको. मग एककच्छ की द्विकच्छ हा प्रश्नच उद्भवत नाही.

बन्यानं अध्यक्षांना विनंती केल्यावर श्री. बाबुबुवा बोलले. ते म्हणाले, " या विषयावर बोलण्याचा अधिकार मला एकटयालाच पोचतो. मी रोज धोतर नेसतो. जन्मल्यापासून—माफ करा. मला कळू लागल्यापासून—आतापर्यंत, पुढेही नेसेन. तेव्हा मी आधी करतो मग सांगतो. मी मारुतीचा पुजारी—मारुती लंगोटी नेसतो ( नेसतो ? काही व्रात्य लोक ओरडले ). हो नेसते, कारण मारुती चिरंजीव आहे. पण तो मुद्दा इथं महत्त्वाचा नाही—मुद्दा हा की मारुतीला लंगोटी असतानाही मी मात्र धोतर नेसतो. यावरून धोतराविषयीची माझी आस्था व्यक्त होते. आता माझं धोतर फार कळकट असतं असं लोक माझ्या माघारी म्हणतात—पण त्याला माझा नाईलाज आहे. न नेसण्यापेक्षा (लोक हसतात) म्हणजे धोतर न नेसण्यापेक्षा म्हणजेच पॅण्ट, बुशशर्ट वगैरे कपडे वापरण्या-पेक्षा कळकट धोतर नेसलेले काय वाईट? शिवाय धोतरामुळं पैशाची बचत होते—साबण व इस्त्रीच्या पैशांची—आता मीच पहा—एकदा धुतलेलं धोतर मी महिनाभर तरी सहज वापरतो ( तुमचं ठीकय् हो—काही लोक )—तात्पर्य आपण सर्वांनी निश्चय करावा की आम्ही नेसू तर धोतरच नेसू—एककच्छ, द्विकच्छ की विनाकच्छ हे महत्त्वाचं नाही. तेव्हा प्रथम मी श्री. मानकापे यांचं क्लास काढल्याबद्दल अभिनंदन करतो. तसंच त्यांना विनंती करतो की त्यांनी धोतरांचे ज्या पद्धती ठरविल्या आहेत, त्यात पीतांबर घालावा. मी पीतांबर शिकवायला तयार आहे—फुक्कट.

लोकांनी भारावून जाऊन टाळ्यांचा कडकडाट केला. आभारा-दाखल बन्या बोलला. बन्याचं आजचं भाषण अगदीच टॉप होतं. बन्या म्हणाला, "मित्रहो—धोतराची आवश्यकता श्री. ढोकफेळकर, बाबुबुवा व टोणपे मास्तरांनी चांगलीच पटवून दिली आहे. विनोद-भैय्या विरुद्ध बोलले—तथापि त्यांचा विरोध आजच्या फायद्याचाच आहे. ते सांगतील त्याच्या विरुद्ध आपल्या इथले लोक वागत अस-तात हे आम्हास माहीत आहे. ते जाऊ द्या—मित्रहो—मी हे कार्य स्वार्थाने सुरू केलेलं नाही. या देशात धोतर चिरकाल राहिलं पाहिजे असं मला वाटतं. आपण जर हे टिकवलं नाही तर मला भीती वाटते काही वर्षांनी, धोतर दृष्टीसच पडणार नाही. आमच्या मुलाबाळांना —पुढील पिढ्यांना 'धोतर' हा शब्द तरी माहीत होईल की नाही कुणास ठाऊक ? कदाचित् पुढे धोतर हे म्युझियममध्ये ठेवण्याची वस्तू होईल. आणि एखाद्या काचेच्या कपाटात ठेवलेले ५० वा ५४।५५ इंची धोतर पाहून आपले वंशज म्हणतील, "अरे आपले पूर्वज काय मूर्ख होते ! हे एवढं लांब कापड ते कसे काय नेसत असतील बुवा—ते हे कापड शरीराभोवती गुंडाळत होते का साडीसारखं ? अर्थात् साडी त्यावेळेस राहिली तर—काही पोरं असंही म्हणतील, अरे इतर कपडे घातल्यावर कदाचित या कापडाची दोन टोकं ते कमरेला बांधत असतील—पण मग पाठीमागे धोतर लोळत असेल—मग मागची दोन टोके घेऊन दुसरा मनुष्य चालत असेल ?—काही असो, आपली पोरं विविध शंका घेऊन आपल्यावर मूर्खपणाचा शिक्का निश्चित मारतील. तेव्हा—लोकहो, ही अवस्था येऊ द्यायची नसेल तर धोतर नेसायला शिका."

बन्यानं भाषण संपवल्यावरोबर मी घोषणा दिल्या. आमच्या धोतरेच्छू मुलांकडून मी त्या तयारच करून घेतल्या होत्या. धोत-रेच्छू हाही बन्यानं कॉईन केलेला शब्द—मी ओरडे "एक धक्का और दो," मुले ओरडत "पॅण्ट बुशशर्ट छोड दो." माझी घोषणा—"जो धोतर से टकरायेगा"—मुले म्हणत "मिट्टीमे मिल जायेगा."

या परिसंवादानं आमचा वर्ग चांगलाच भरभराटीस आला. परगावचे लोक येऊन मुद्दाम राहून धोतर शिकू लागले. आणखी चार असिस्टंट्स् आम्ही नेमले. जागा मोठी घेतली. चार शो-केसेस् केल्या— निरनिराळ्या क्षेत्रांतली माणसं येत होती. महत्त्वाची—विन महत्त्वाची. पण अमेरिकेच्या वॉर अॅण्ड वॉण्ट मिशनचा मि. वुल्फ हा येऊन धोतर शिकून गेला तेव्हा मात्र आमचा आनंद धोत-रात मावेनासा झाला. मि. वुल्फमुळे आमची कीर्ति परदेशात पोचली.

—आणि एके दिवशी मी टपाल उघडलं तेव्हां हर्षानं बेहोश झालो. अमेरिकेतल्या शिकागोमधील बफेलो अॅण्ड बफेलो क्लबने "धोतर शिकविण्यासाठी एक खास प्रतिनिधी पाठवा" अशी विनंती केली होती. बन्याच्या आग्रहावरून मी शिकागोला गेलो. अमे रिकेच्या मुंबईतील एम्बसीनं सर्व सहकार्य दिलं होतं—हजार दोन हजार धोतरंही क्लबकडे पाठवली होती. अमेरिकेत मी अनेकाना धोतर नेसायला शिकवलं—व्याख्याने दिली—टीव्हीवर माझं प्रात्यक्षिक झालं—सुमारे दीड वर्ष मी अमेरिकेत होतो—

दीड वर्षानंतर मी परत आलो. अमेरिकन एम्बसीनं 'ताज-

**होळी रे होळी—अभ्यासाची होळी !**



" लिवा" मुलाची वर्तणुक लय चांगली व्हती ऽऽ ! "



अनुक्रमणिका

महाल'मध्ये मला घाटाचा निरोप दिला. घाईमुळे मी बन्याला कळवू शकलो नाही. गावात उतरलो अन् तडक क्लासकडे गेलो-अत्यंत उत्सुकतेनं-पहातो तो बोर्ड दिसला नाही. म्हटलं बन्यानं आणखी मोठी जागा घेतली की काय ? बारकाईनं पाहिलं-बन्याच्या नावाची पाटी होती--बेल दावली--दरवाजा उघडला गेला--बन्याच होता. बन्याला मला पाहून आश्चर्यच वाटलं-- आनंदही झाला-- बन्यानं मला मिठीच मारली--"ब्रेव्हो, चित्या काय म्हणते अमेरिका ? सुखरूप आहे ना ?"

"बन्या, पण क्लासचा बोर्ड ?"

"थांबरे, आलास तर बस जरा-साऽऽरं सांगतो तुला."

"सारं सांगतो ? म्हणजे ?" मी अत्यंत अस्वस्थतेने ओरडलो.

"अरे हो-जरा सबूर. . . आधी चहा तर घेशील."

मला गप्प बसणंच भाग होतं. मी अमेरिकेत राहिलो--येताना इंग्लंडमध्येही जाऊन आलो. पण बन्याच्या चहासारखा चहा कुठेही मिळाला नाही. बन्याचा चहा कळकटच असतो, पण मला तोच फार आवडतो.

बन्या आत गेला. मी खोली बारकाईनं पहात होतो. क्लासचे फलक कुठे दिसत नव्हते. शो-केस एका बाजूला पडलेली होती--मॉडेल अस्ताव्यस्त होतं---धोतर कसंबसं नेसवलेलं होतं--त्यावर बरीच धूळ साचली होती.

बन्या चहा घेऊन आला. चहाचा कप बन्या माझ्या हातात देत होता तेव्हाच मी न राहवून ओरडलो, " बन्या--क्लासचं काही सांगतोस की नाही ?"

"आधी चहा तर घे."

मी कप तोंडाशी लावला-आजचा बन्याचा चहा काही वेगळाच होता--पण मी त्याबाबत काही विचारण्याच्या मूडमध्ये नव्हतो.

"हे पहा चित्या--तू शांतपणे ऐकून घेणार असशील तर सांगतो"

"बोल."

"तू गेलास-क्लासेस जोरात चालत होते. मी मोठी जागा घेतली-चारच्या ऐवजी आठ अॅसिस्टंटस् नेमले. वेळा वाढवल्या. सहा महिन्यात दहा हजार रुपये वाचवले. गावातल्या व्यापाऱ्यांनी पुन्हा एकदा माझा सत्कार केला. धरमदासनं तर धोतरांची एक वॅगनच मागवली "

"बन्या, मग क्लास आहे कुठं ?"

" तेच तर सांगतोय्--एके दिवशी विचित्र घटना घडली. मी महत्त्वाची पत्रे वाचत होतो--अन् उत्तरे डिक्टेट करत होतो--वश्या लिहून घेत होता-- वश्या तुझ्यामागे माझं सेक्रेटरीचं काम पहात होता-- इतक्यात "मे आय कम ईन, सर" म्हणून आवाज आला. मी न पाहताच 'कमइन' म्हणालो.

विचारणारी व्यक्ती आत आली.

मी पत्र वाचतच "बसा"-म्हणालो.

"मला नाव नोंदवायचं आहे तुमच्या क्लासमध्ये ?" आवाज बायकी होता. मी दचकून पाहिलं-- बाईच होती.

"आँ ? अहो, आम्ही धोतर नेसायला शिकवीत असतो."

"एक्स्क्यूज मी. ते माहीतंय् मला--अन् . . . साडी नेसायला शिकण्यासाठी तुमच्याकडे येण्याची गरज नाही मला --मला धोतरच शिकायचंय् "

"तुम्हाला धोतर शिकायचंय् ? अहो, काय बोलताय काय ? धोतर. . .

मला तर काय बोलावं तेच कळेना बरं का चित्या, इतक्यात तीच म्हणाली,

"त्यात काय, तुम्ही माझ्याकडे नीट पहा."

"आँ ? तुमच्याकडे पाहू ? छे हो, असं दुसऱ्याच्या पोरीबाळींकडे पाहणं मला आवडत नाही."

"पण मी पहा म्हणते ना.मग काय हरकतंय् ? अय्या इतके कसे तुम्ही" . . . .अन् असं म्हणत बरं का चित्या, तिनं असा अभिनय केला म्हणतोस- मग मात्र मला राग आला - राग नव्हे-- माझ्यातला स्वाभिमान का काय म्हणतात,तो जागा झाला. अरे चक्क नामर्द म्हटलेलं कोण सहन करील ?"

मग मात्र मी चक्कपणे निरखून पाहिलं अन् काय सांगू तुला चित्या-यार मार डाला उसने कसला पोशाख केला असेल असं वाटतं तुला ?"

"मला नाही माहीत बेवकूफ--हे पुराण बंद कर--क्लासबद्दल विचारलं होतं मी तुला."

"चित्या, तेच चालू आहे--जरा थांब " बन्यानं पुन्हा सुरुवात केली. "तिनं चक्क तंग जिन् अन् वरती बुशशर्ट--बुशशर्ट कसला म्हणा-चोळी न बुशशर्ट यांच्या मधलाच काही तरी प्रकार होता. . .

"पाहिलंत " ती म्हणाली "आता सांगा मी जर पुरुषासारखी पॅण्ट घालते तर मग धोतर नेसलं म्हणून काय बिघडलं ?"

तिचा मुद्दा बिनतोड होता--

"मग तुम्ही कसं शिकाल ? कसं म्हणजे एककच्छ की द्विकच्छ की विना. . . .आय अॅम सॉरी हं. "

"हं त्यात काय, मला किनई बाई, सारे प्रकार शिकायचेत्-पण प्रथम मी ते डबलकाष्टा शिकीन."



B. Y. P.




"डबलकाष्टा ? अहो तसं नेसाल तर तुम्हाला लोक संघवाला समजतील."

"छट्—संघात् बायका थोडयाच असतात. अन् दुसरं म्हणजे संघवाले मिशा ठेवतात तेव्हा—

मग मात्र मी थक्कच झालो. चित्या—डोण्ट मिसअंडरस्टॅण्ड मी—पण एक गोष्ट मात्र मी केली. "तिच्यासाठी मी स्वतंत्र वेळ ठेवली—आणि जागाही"—

"पण वन्या—क्लासचं काय ?" माझी सहनशीलता शिगेला पोचली होती.

"चित्या... चित्या. अमेरिकेला जाऊन आलास अन् अगदी तसाच राहिलास —तिला धोतर नेसायला शिकवताना माझा जीव अगदी कासावीस झाला—माझं धंद्याकडे दुर्लक्ष झालं—ॲसिस्टंटस्‌नी मला बनवलं—परस्पर पैसे मारले—एकानं तर स्वतंत्र वर्गच सुरू केले. अर्थात् माझी संख्या रोडावली."

"थूत्तिच्या....वन्या एका पोरीच्या पायी आपल्या जीवनाचं ध्येय.. "

"हो, हो....हो चित्या जरा सांभाळून—स्वतःच्या वहिनीबद्दल भलतसलतं बोलणं बरं नाही."

"म्हणजे ? म्हणजे तू...तू...तू... तिच्याशी चक्क लग्न केलंस....धन्य आहेस....कोण आहे कोण....?

इतक्यात टचॅंहा—टचॅंहा असा आवाज आला. मी आवाजाच्या रोखाने स्वयंपाकघराकडे पाहतोय न पाहतोय तोच "पहा हो, गुलाम ऐकेचना—तुमच्याजवळ तरी " असे म्हणत दरवाजाजवळ एक बाई—अर्थात् वन्याच्या सौभाग्यवती आल्या—मला पाहून त्या किंचित् भांबावल्या—

"अग, आता काही हरकत नाही. ये ना त्याला घेऊन—हा माझा मित्र चित्या—नुकताच अमेरिकेतून आलाय्—मी तुला सारं सांगितलचय् त्याच्याबद्दल"—

"अय्या, हेच का ते ? अग्ग बाई —तुम्ही आतापर्यंत सांगितलं नाहीत ! हे आलेत म्हणून—बरं का हो भावजी (हे अर्थात मला उद्देशून) तुमच्याबद्दल यांनी मला खूपखूप सांगितलंय् हं—तुम्हाला केव्हा एकदा पाहते असं झालं होतं मला... ( तरी मी थोडा रागातच होतो )— अन् काय हो, ( हे अर्थात् वन्यास ) नुसता चहा काय दिलात त्यांना—थांबा हं मी चांगले पोहे करते ( मग मात्र माझा राग गेला—गेल्या दीड वर्षात पोहे खायला मिळाले नव्हते)— बरं का भावजी— तुम्ही आलात बरं झालं—मी कित्ती म्हणत होते यांना क्लासेस चालू करा म्हणून—पण कसचं काय ? सारखं माझ्याभोवतीच घोटाळत असतात—आता तुम्ही आलात बरं झालं— उद्यापासून क्लास चालू करू—चक्क पाटीवर तुमचंही नाव लिहा भावजी अमेरिका रिटर्ण्ड म्हणून—आणि बघा त्या मेल्याच्या क्लासचे कसे तीन तेरा वाजतात ते— अग्ग बाई मी काय बोलतच राहिले—हा गुलामही कसा अगदी गप्प बसला—भावजी, पहा ना तुमच्याकडे यायचं म्हणतो ( एवढे म्हणतच त्यानी चि. बन्याला दुपत्यासकट मांडीवर दिला )— मी आत्ता आलेच हं—पोहे घेऊन—

"कुरं... कुरं. .—च्चा च्चा... मी चि. बन्याला खेळवू लागलो. एवढ्यात स्वयंपाकघराच्या दरवाजातूनच परत येत सौ. वन्या मानकापे म्हणाल्या, " भावजी, एक मात्र नियम ॲड करा हं क्लासमधल्या रूल्समध्ये—स्त्रियाना प्रवेश नाही म्हणून."

•••

रोमन साम्राज्याचा अंत म्हणजे एक प्रकारचा युगांतच ! त्या साम्राज्याचा इतिहास लिहिण्याचा प्रचंड उद्योग यशस्वीरीत्या पार पाडणारा ब्रिटिश लेखक **एडवर्ड गिब्बन** यांच्या मृत्यूला गेल्या सतरा जानेवारीला एकशे पंचाहत्तर वर्षे पूर्ण झाली त्यानिमित्त त्याच्या जीवनपटाचे हे धावते दर्शन.....

# एडवर्ड गिब्बन



"मला संसेदेचे सभासदत्व मिळवून देण्यासाठी तुम्ही पंधराशे पौंड बाजूला काढून ठेवले आहेत, ह्या घटनेनेच मी भारावून गेलो आहे. डोळ्यात तेल घालून राष्ट्रहिताचे रक्षण करणाऱ्या ह्या सभागृहात बसताना कोणालाही आनंदच होईल. परंतु त्याला मी पात्र नाही. ह्यासाठी लागणारी तोलामोलाची बुद्धी माझे ठिकाणी नाही. तिचा साक्षात्कार घडविणारे वक्तृत्वही नाही. कदाचित् तुम्ही म्हणाल, स्वार्थासाठी तरी मी संसदेत जाणे योग्य ठरेल. वक्तृत्वाची हातोटी नसली, चार लोकात मिसळण्याची सवय नसली अथवा विरोधी पक्षांचे आघात सोसण्याची ताकद नसली तरी हरकत नाही. हे विचार राजमान्य, लोकमान्य नसले तरी त्यात वाईटही काही नाही. दुसरी गोष्ट म्हणजे ज्याला मीच लायक नाही, त्याचा दुसऱ्यांना फायदा कसा होणार. साहजिकच अशा परिस्थितीत मला मोठे करण्यापेक्षा मला सुखी करण्यात तुम्हाला समाधान वाटेल. मी आज बावीस वर्षांचा झालो आहे. इतक्या लौकर स्थायिक होण्याची माझी तरी इच्छा नाही. तेव्हा मी अशा परिस्थितीत आजच फिरून घेतले नाही; तर कदाचित् पुढे ते जमणारही नाही. फरान्सची आजची स्थिती इतकी स्फोटक आहे की, ह्या देशात पाऊल टाकणे अजून तरी काही काळ शक्य नाही. म्हणून मी प्रथम इटलीला जावयाचे ठरविले आहे."

सुप्रसिद्ध इतिहासकार गिब्बन ह्यांच्या वरील पत्रापायी त्याच्या वडिलांनी संसदेच्या सभासदत्वासाठी आग्रह करण्याचा नाद सोडून दिला. इटलीची वारीही काही काळ पुढे ढकलली गेली. ज्या रोमन साम्राज्याच्या इतिहास लेखनाने त्यांचे नाव अजरामर झाले, त्याचे सूतोवाच मात्र केले गेले.

सत्तावीस एप्रिल सतराशे सदतीस साली त्यांचा जन्म झाला. सर्व भावंडात ते ज्येष्ठ. परंतु सारा जीवनपट ह्यानीच पाहिला. आई व तिचे पाठोपाठ सहाही भावंडांना टिपून घेऊन जाणारा मृत्यू त्यांच्या सभोवतालीसुद्धा कितीतरी काळ पिंगा घालीत होता. त्याचे तोळामासा प्रकृतीपायी आजारपण ही एक त्याचे लहानपणी कायमची व्याधी होऊन बसली होती. त्यातून ते जगले, ह्याला कारण जितके औषधी उपचार ठरले तितकीच त्यांची मावशीही ठरली. ती नसती तर भावंडांचे मार्गाने ते केव्हाच गेले असते. गिब्बन ह्यांचे वडील स्वभावाने ममताळू होते, तसेच लहरीही होते. त्यामुळे पितापुत्रात मत्सर उत्पन्न झाला नाही. पण मायेची गाठही बांधली गेली नाही.

पाचवीला पुजलेल्या आजारपणापायी त्यांच्या शिक्षणाचाही खेळखंडोबा झाला. एका शाळेच्या छप्पराखाली दोन वर्षांहून अधिक काळ ते कधीच राहू शकले नाहीत. त्यातच तत्कालीन राजकीय पंथांच्या लाथाळीची भर पडे. विद्यार्थ्यालाही त्याच्या वाडवडिलांच्या राजकीय मतापायी त्रास सोसावा लागे. गिब्बन ह्याचे घराणे टोरी पक्षाचे. ह्याचाही त्यांना काही कमी त्रास झाला नाही. परंतु त्यांच्या ठिकाणी उपजतच असलेली वाचनाची गोडी त्यांच्या शिक्षणाला कारणीभूत ठरली. "मला हिंदुस्थानचे राज्य कोणी बहाल केले तरी मी वाचन सोडणार नाही." असे ते म्हणत ते त्याचमुळे. अर्थात ह्या वाचनात एकजिनसीपणा मात्र नव्हता. केवळ तत्त्वज्ञानापेक्षा हाडामासाच्या माणसांनी घडविलेला म्हणून इतिहास त्याना जवळचा वाटे एवढेच. साहजिक इतर विषयांपेक्षा इतिहासाचे वाचन आपोआपच अधिक होई. इतिहास वाचनाची आवड इतकी वाढलेली होती की, "जेवणाचे बोलावणे आले तर मोठ्या कष्टाने पुस्तक बाजूला ठेवत असे" अशी कुरकुर ते आत्मचरित्रात करतात. जगाचा इतिहास वाचताना त्याचे

अनुषंगाने रोम व ग्रीक इतिहासाचीही ओळख त्याना झाली. अरब व पर्शियन इतिहासाचे वाचनही त्यानी एव्हाना पुष्कळच केले होते. परंतु पुढे कधी आपण ह्या विषयावर ग्रंथ लिहू ही कल्पना त्यांच्या ध्यानीमनीही नव्हती.

## सोळाव्या वर्षी विद्यापीठात प्रवेश

वयाच्या चौदा वर्षापर्यन्त दुखण्याने त्यांचा पिच्छा पुरविला. परंतु त्या नंतर मात्र त्यांच्या प्रकृतीत सुधारणा होऊ लागली. सोळाच्या वर्षी ते संपूर्णपणे वरे झाले. अशा वेळी शालेय शिक्षण पुरे करून घेणे योग्य ठरले असते. परंतु वडिलांनी त्यांना ऑक्सफर्ड विद्यापीठात शिक्षणाशाठी पाठविले. वय अवघे सोळा वर्षाचे, त्यात शालेय शिक्षण जवळजवळ नाहीच. ऑक्सफर्ड विद्यापीठात वावरणारे धर्मगुरु, तत्त्वज्ञानाचे ओझे घेऊन फिरणारे प्राध्यापक, शिक्षक, त्यांचे अधिकार, त्यांच्या पदव्या ह्यातून आपले पदरी काय पडणार अशी भ्रांत गिव्बन याना अगदी पहिल्या दिवसापासून वाटू लागली. एकोणिसाव्या शतकात शिक्षण क्षेत्रात अद्वितीय ठरलेले ऑक्सफर्ड त्यावेळी धर्मगुरूंच्या धार्मिक वखेडयांनी धुमसत होते. त्यातच राजकीय पक्षांची लाथाळी येथेही चालू असायची. आपल्याला मिळणाऱ्या शिक्षणाबद्दल गिव्वन यांनी आत्मचरित्रात लिहिले आहे की, “ मी ज्या शिक्षकांच्या हाताखाली शिकत होतो, त्यांना मी काय करतो, काय वाचतो, बुट्टया कां मारतो, ह्याबद्दल फारसे काहीच माहीत नसे व काही वाटतही नसे. ते मला ह्याबद्दल कधी विचारीतही नसत. त्यामुळे सुरुवाती सुरूवातीला बुट्टी मारल्याच्या दुसऱ्या दिवशी मी आपणहून त्यांना काहीतरी सबब सांगत असे, पुढे तीही मी बंद केली. अभ्यासाच्या विषयातही गोडी उरली नाही. अशा प्रकारे शिक्षणक्रम विनाशिक्षण चालू होता. उलट ह्या हंगामात विद्यापीठातील प्राध्यापकांच्या शिकविण्यापायी मौलिक परंतु रुक्ष विषयांवद्दल जी अढी निर्माण होणे शक्य होती ती मात्र झाली नाही. ज्या स्वतंत्र वुद्धीने व स्वयंभू विचारसरणीने त्यांनी इतर वाचन चालू ठेवले होते ते कितपत झाले असते हाही एक प्रश्नच आहे. व्हॉल्टेर, रूसो ह्यांच्या वाङमयाचे वाचन धर्मगुरूंची व शिक्षकांची घृणा उत्पन्न करणारी वर्तने, प्रचलित आचरट समजुती, ह्यापायी गिव्वन ह्यांची धर्मपंथ वदलण्यापर्यंत मजल गेली. प्रॉटेस्टंट पंथ सोडून रोमन कॅथॉलिक पंथाची दीक्षा त्यांनी घेतली. परंतु त्यांच्यामध्ये ह्या पंथावद्दलही कधीच कडवेपणा उत्पन्न झाला नाही. धार्मिक शिक्षणाचा सुरवातीपासून अभाव हेही एक कारण ह्याला असू शकेल. तसे पाहिले तर ज्या मावशीच्या सहवासात त्यांचे लहानपण गेले ती मोठी कडवी होती. तिचे उपासतापास, व्रते, सकाळ-संध्याकाळ देवापुढे वसणे, ह्याचा त्यांच्यावर परिणाम होणे स्वाभाविक होते. परंतु तसाही तो

प्रा. गजानन आपटे

झाला नव्हता. ह्यामुळे रोमन साम्राज्याचा इतिहास लिहिताना त्यांच्या ठिकाणी वसलेली निधर्मी वृत्ती त्यांना इतर धर्मावद्दल लिहिताना उपकारकच ठरली. परंतु हे पंथांतर मात्र त्यांना भोवले. वडिलांनी त्यांची येथून उचलबांगडी केली. विद्यापीठानेही ह्यापायी त्यांना आपले दरवाजे बंद केले असतेच. अशा प्रकारे विनाशिक्षण विना पदवी, उलट रोमन कॅथॉलिक पंथाचे ओझे घेऊन हा चौदा मासाचा शिक्षणक्रम आटोपला. परंतु ह्यावद्दल त्यांनाही फारसे वाईट वाटले नाही. ते म्हणत, “ ऑक्सफर्ड विद्यापीठाला माझेवद्दल जसा आदर अथवा अभिमान वाटणार नाही, तसाच ह्या वास्तूवद्दल मलाही प्रेम वाटणार नाही. उलट ह्या जंजाळातून सुटलो असेच मला ह्या विद्यापीठाच्या कमानीतून बाहेर पडलो त्यावेळी वाटले.”

काहीही करून मुलाला प्रॉटेस्टंट पंथात पुन्हा आणायचे, शिक्षण पुरे करायचे ह्या उमेदीनें वडिलानी त्यांना स्वित्झर्लंडमधील लाउसन्से ह्या गावी पाठविले. हा देश त्यांना नवीन होता, गाव नवीन होता, जागा नवीन होती, शिक्षक नवीन होते, सभोवतालची माणसं नवीन होती, वातावरण नवीन होतं, तशी येथील फ्रेंच वोलीही नवीन होती. वय सोळा होतं.

## विविध भाषांचे अध्ययन

ऑक्सफर्ड विद्यापीठातील स्वातंत्र्य ह्या ठिकाणी उपभोगावयास मिळणार नव्हते. खिशात पसा खुळखुळणार नव्हता. रहाते घर व त्यात वावरणाऱ्या त्यांच्या शिक्षकांची करडी नजर एवढयातच त्यांना रहावयाचे होते. गिव्वन आजपर्यंत पुष्कळसा काळ घरावाहेरच जरी राहिले होते तरी त्यांच्या मूळच्या वुजऱ्या स्वभावात फरक पडलेला नव्हता. ह्या वास्तूत ते पाच वर्षे राहिले. त्यांचे गुरुजी वागण्यात सडेतोड होते; परंतु एककल्ली नव्हते. त्यांचे सारे शिक्षण घरीच चालायचे. एका मागोमाग नव्या जुन्या वाङमयकृतींचा, भाषांचा अभ्यास चालायचा. ह्याव्यतिरिक्त गिब्बन ह्यांचे स्वतंत्रपणे वाचन चालू असे ते वेगळेच. अशा प्रकारे होणाऱ्या दुहेरी वाचनापायी त्यांच्या विचारांची कक्षा वाढली. इंग्रजी वृत्ती पुष्कळशी पुसून गेली. ह्या दोन्ही गोष्टी त्यांच्या पदरी पडावयास त्यांच्या स्वकष्टाइतकाच त्यांच्या गुरुजींचा समंजसपणाही कारणीभूत होता. गुरुजींनी ह्या पाच वर्षात असे कधीही मानले नाही की, त्याच्याविना गिब्बनना पर्याय नाही. उलट ज्यावेळी त्यांना आढळून येई की, शिष्याला मार्गदर्शनाची जरूरी नाही, अशा वेळी ते आपणहून माघार घेत. अर्थात् एवडा विश्वास शिक्षकांच्या ठिकाणी उत्पन्न व्हावयास गिब्बन ह्यांच्या ठिकाणी असलेली अभ्यासूवृत्तीही तितकीच कारणीभूत होती. मिळालेल्या ह्या स्वातंत्र्याचा ह्यापायीच पुरेपूर फायदा त्याना घेता आला. कुठल्याही विषयाची गुंतागुंत न करता विचार करण्याची प्रवृत्ती, घाई अथवा वरवर वाचन करण्याचा, विषय हाताळण्याचा तिटकारा. ह्यामुळे केलेले भरपूर वाचन विशिष्ट काळातील केवळ अमुक एका लेखकापुरते वाचन मर्या-






दित न ठेवता त्या काळाला धरून जे काही वाचावयास मिळणे शक्य होते ते वाचण्याची इच्छा. ह्यापायी वाचन शास्त्रोक्त तर झालेच परंतु अमर्यादही झाले. भाषेमुळे वाचनाला पडणारी मर्यादा लक्षात घेऊन ते लॅटिन, ग्रीक भाषा शिकले. फरेंच भाषेत उठणे बसणेच ह्या हंगामात चालू होते. साहजिकच फरेंच बोली त्यांना चांगलीच हाताळता येत होती. जर्मन भाषेचा मात्र त्यांनी फारसा अभ्यास केला नाही. उलट ग्रीक भाषेचा अभ्यास करून तीत फारशी प्रगती करणे त्याना जमले नाही; परंतु अज्ञानापायी अडवणूक होणार नाही इतका त्यांचा जर्मन व लॅटिन भाषांचा अभ्यास झाला होता.

ह्या वाचनाचा व परदेशातील वास्तव्याचा त्यांच्या भाषेवर जसा परिणाम झाला तसाच वागणुकीवरही झाला. केवळ त्यांच्यातील अव्वल इंग्रजीपणा नाहीसा होण्यापुरता हा परिणाम मर्यादित न राहता ते विचारात आचरणात व भाषेत युरोपियन बनले. युरोप खंडाची विविधता त्यांच्या भाषेतही डोकावू लागली. एवढे असूनही भाषेतील सरळपणा, मुद्देसूदपणा अबाधित राहिला. अर्थात् त्यांचे वयही टिपण्याचे होते, लवचिकही होते. सोळाव्या वर्षी म्हणजे अगदी लहान वयातच भाषांचा व इतिहासाचा ते अभ्यास करीत होते ही गोष्ट दृष्टीआड करून चालणार नाही. एका दृष्टीने हाडामासाच्या गुरुजीपेक्षा त्यांचे वाचनच त्यांना गुरुपदी होते असे मानावयास हरकत नाही. त्यांनी केलेले वाचन, मनन हे सर्व त्यांच्या आवडीनिवडीनुसार चालले होते. त्यांच्या रोमन साम्राज्याच्या लिखाणाला हे पोषक ठरले. ह्या ग्रंथामुळे जे घवघवीत यश त्यांना प्राप्त झाले ते लक्षात घेता, त्यांची आवडनिवड अचूक तर होतीच परंतु शास्त्रोक्तही होती असेच म्हणावे लागेल. सोळाव्या वर्षी प्रेमाचा प्रादुर्भाव पुष्कळांच्या जीवनात होतो. गिब्बन ह्याला अपवाद ठरले नाहीत. फक्त प्रेमात पडल्यामुळे ते काही काळ प्रेमवीरासारखे विव्हळले. परंतु उलट आज्ञाधारक मुलाप्रमाणे त्यातून बाहेरही पडले. त्यांच्या वडिलांनी नकार दिल्यामुळे हे प्रेमप्रकरण संपुष्टातच आले. आयुष्यभर ते ब्रम्हचारीच राहिले.



## चरितार्थासाठी सैन्यात नोकरी

गिब्बन ज्या कालखंडात वावरले, वाढले तो काळच राजकीय व वाङ्मयीन-दृष्ट्या क्रान्तिकारक घटनांनी घुसळून निघत होता; क्रांतीच्या विचारांनी घुमत होता. इंग्रजी भाषेतील शब्दकोषाचे जनक डॉ. जॉनसन यांनी सारे इंग्लंड भाषेवरील अस्खलित प्रभुत्वाने पादाक्रांत केले होते. चौदाव्या लुईने घालून दिलेल्या स्वातंत्र्याच्या सीमा फरान्समधील जन-क्रांतीने साफ धुवून टाकल्या होत्या. इंग्लंडच्या किनाऱ्यावर त्याचे पडसाद उमटू लागले होते. रूसो, व्हॉल्टेर यांचे विचार त्यात अधिक भरच टाकीत होते. रूसोची पुष्कळशी मते त्याना पटत, परंतु केवळ जुने म्हणून सर्वच टाकावू हा रूसोचा दृष्टिकोन त्यांना कधीच पटला नाही. ह्याचा परिणाम होऊन गिब्बन ह्यांचे मन पुरातन कालाकडच अधिकाधिक सरकू लागले. कदाचित् ह्यातही रोमन साम्राज्याचा इतिहास लिहावयास ते का प्रवृत्त झाले त्याचे कारण मिळू शकेल.

स्वित्झर्लंडची पाच वर्षे संपली. वडिलांची उद्दिष्टे संपूर्ण जरी नाही तरी काही अंशी सिद्धीस गेली. गिब्बन घरी परतले. परंतु पुढे काय हा प्रश्न त्यांच्या पुढे उभा राहिला. स्वित्झर्लंडच्या वास्तव्यात लिहिलेला एक ग्रंथ त्यानी प्रसिद्ध केला. फरेंच भाषेत इंग्रजी लेखकाने लिहिलेला म्हणून त्या ग्रंथाला थोडेसे श्रेय मिळाले; परंतु जुने ते सर्व टाकाऊ ह्या तत्कालीन प्रचलित विचारसरणीला टोला हाणायचा त्यात प्रयत्न केला असल्यामुळे, लेखकाची ओळख काही काळ तरी ठराविक लोकांपुरतीच रेंगाळत राहिली. ते सैन्यात दाखल झाले व पुन्हा संपूर्ण नवीन पार्श्वभूमीवर ते वावरू लागले. ग्रंथाची सोबत घेणाऱ्याला शस्त्राची सोबत कितीसा विरंगुळा देणार हा प्रश्नच होता. परंतु पुढे काय, ह्या भेडसावणाऱ्या प्रश्नाचे ते उत्तर होते. अर्थात ते फार काळ टिकणे अस्वाभाविकच होते. आणि झालेही तसेच. अडीच वर्षांनी ही नवकला संपुष्टात आली. ह्या काळात फारसे वाचन झाले नाही; परंतु लष्कराच्या अंतर्गत जीवनाची ओळख मात्र त्याना झाली. रोमन साम्राज्याचा इतिहास युद्धानी भरलेला आहे. ह्या युद्धात लष्कराच्या हालचालींच्या वर्णनास मात्र ह्या ज्ञानाने त्याना चांगलाच हात दिला. बिगर-लष्करी लेखकाला भेडसावणारा हा प्रश्न त्यांना कधीच चकवू शकला नाही. लष्करातील भटकंती व छावण्यांमधील थिल्लर जीवन ह्यात वावरत असताना एकीकडे ग्रंथ रचनेसाठी विषय शोधणे चालूच होते. एका मागोमाग निरनिराळे विषय त्यांच्या मनात डोकावून जात होते. परंतु निश्चितता कशालाच प्राप्त होत नव्हती.

## महान ग्रंथ लिहिण्याचा संकल्प

दोन अडीच वर्षांचे लष्करी जीवन संपवून उरलासुरला हिशोब करून व मिळालेले पैसे खिशात टाकून गिब्बन घराकडे परतले. इतके दिवस भिजत पडलेली युरोपच्या प्रवासाची कल्पना पुन्हा डोकावू लागली. ह्यावेळी वडिलानी होकार दिला. त्यानी देऊ केलेले पंधराशे पौंड घेऊन त्यानी इंग्लंडची खाडी ओलांडली. तब्बल तीन महिने पॅरिसमधे राहून, आल्प्स् पर्वत ओलांडून ते इटलीत येऊन दाखल झाले. इटलीच्या प्रवासाची तयारी त्यानी पूर्वीच केली होती. जुन्या साम्राज्यातील घटक राज्यांची, शहरांची, गावांची यादी त्यांचे-

जवळ होती. त्यांची महती व माहिती त्यांना मुखोद्गत होती. रोमन साम्राज्यातील राजपटू रोम्यूलस कुठे उभे रहात, टयूले कोठून बोलत; सिझर कुठे कोलमडून पडले ह्याचा चित्रपट ह्या भागातून वावरताना त्यांच्या डोळ्यासमोर उभा राही. धर्मगुरुनी प्रार्थनेच्या वेळी चर्चमधून उच्चारलेले शब्द त्यांच्या कानात रेंगाळत.धर्मगुरुंच्या दर्शनासाठी प्रशस्त चौकातून जमलेला लोकसमूह त्यांच्यासमोर उभा राही. रोमच्या सिनेटमध्ये तत्कालीन मुत्सद्यांनी उच्चारलेले शब्द त्यांच्या कानात घुमत. रोमच्या गतवैभवाचा चित्रपट त्यांच्या डोळ्यासमोरून सरकू लागे. ह्याच वातावरणात वावरत असताना सतराशे चौसष्टच्या पंधरा ऑक्टोबरला रोमन साम्राज्याचा इतिहास लिहिण्याचा संकल्प त्यांनी केला. विषय निश्चित झाला. त्यावर सर्व लक्ष केंद्रित झाले. रोमन इतिहासाची पाने त्यांच्या समोर फडफडू लागली. फक्त त्यासाठी लागणारे दैनंदिन जीवनातील स्वास्थ्य हवे होते. पण दुर्दैवाने सर्व काही विपरीतच वाढून ठेवले होते.

घराकडे परतण्यासाठी त्यांनी फ्रान्समध्ये पाऊल ठेवले. "तावडतोब निघ" अशा आशयाचे त्यांच्या वडिलांचे पत्र त्याना मिळाले व ते लगेच घरी परतले. वडिलांची सांपत्तिक व शारीरिक स्थिती साफ खालावल्याचे त्यांना आढळून आले. त्यांचे वडिल पुढे वर्षभरच वाचले. इतके दिवस काळजी नव्हती ती पाठीमागे लागली. ना पदवी ना पैसा!

आणि हे सर्व घडत होते रोमन साम्राज्याचा इतिहास लिहिण्याचा संकल्प सोडून काही दिवस झाले नाही तेव्हा. परिस्थितीपायी मनाला हतबलता आली होती. अव्याहतपणे काम करण्याचा त्यांचा निश्चय होता. म्हणूनच ते ह्या परिस्थितीत पुन्हा कामाला लागले होते. आजपर्यंत ज्या ज्ञानासाठी आपण अहर्निश कष्ट घेतले, प्रसंगी व्यवहारी जगाला डावलले, तेच जग आपणावर मात करणार असेल तर आजपर्यंतची तपश्चर्या फोल ठरेल ही जाणीव अंतर्यामी बोचत होती.

सतराशे शहात्तरमध्ये रोमन साम्राज्याचा पहिला खंड प्रसिद्ध झाला. तो बाहेर पडेपर्यंत ह्या विषयाची कुणालाही कल्पना नव्हती. खुद गिब्बननाही खात्री वाटत नव्हती. पहिल्या खंडाच्या यशाला लेखकापेक्षा प्रकाशकच जास्त जबाबदार आहेत असे ते वारंवार म्हणत. हा खंड हातावेगळा होईपर्यंत सर्व काही अंधारमय होते. एवढा प्रचंड तेराशे वर्षांचा कालखंड सूत्रबद्ध करणे आपणास कितपत झेपेल ह्याबद्दल खुद्द गिब्बनना शंका होती. कित्येकदा मध्येच सर्व सोडून द्यावे असे त्यांच्या मनाला वाटे. सर्वसाधारणपणे अशा प्रकारचे प्रदीर्घ काम करणाऱ्या व्यक्तीच्या वाटयास येणारा आशानिराशेचा लपंडाव गिब्बनना काही वेळा भंडावून सोडी; परंतु निराशेपायी नाउमेद होण्याला प्रसंगी कारणीभूत ठरणारा अपक्वपणा त्यांच्या ठिकाणी नव्हता. जिथे रोमन-साम्राज्य नांदले होते त्या भूमीचा कोपरान्‌कोपरा त्यानी पायाखाली घातला होता. ज्या घटनांमुळे रोमन-साम्राज्य अद्वितीय ठरले होते त्या घटना त्यांना मुखोद्गत होत्या. आणि ज्या ठिकाणी ह्या घटना घडल्या होत्या त्या वास्तूत ते वावरले होते. उपलब्ध असलेली रोमन इतिहासाची ओळन्‌ओळ त्यानी वाचली होती.

## पहिल्या खंडाचे प्रचण्ड स्वागत

पहिल्या खंडाचे स्वागत अकल्पित ठरले. पंडितांनी स्तुतिसुमने उधळली. इतके दिवस इंग्रजी समाजाला अपरिचित असणाऱ्या व्यक्तीला ह्या एका कृतीमुळे सारे इंग्लंड ओळखू लागले. कर्तृत्वापेक्षा यशाला भाळणारे जग त्यांच्या ह्या यशाने आश्चर्यचकित झाले.

सहा खंडात ग्रथित केलेला हा इतिहास ही एक ऐतिहासिक सत्य घटना होती. रोमन साम्राज्याचा अंत ही केवळ भौगोलिकरीत्या रोमन साम्राज्यापुरती मर्यादित ठरणारी घटना नव्हती तर एका विशिष्ट प्रणालीचा हा अंत होता. एका विशिष्ट श्रद्धास्थानांच्या नीतीमूल्यांचा ऱ्हास होता. एका संस्कृतीचा, एका राजकीय परंपरेचा हा अस्त होता. ही घटनाच मुळी इतकी प्रचंड होती की, अजूनसुद्धा तिचा यावा तेवढा उमज माणसाला येत नाही. उलट मानवी मन ह्या घटनेत भारावून जाते; कल्पनेला ओहोटी लागते. ही घटना म्हणजे धर्माच्या अथवा धर्मगुरुंच्या सत्तेचे केवळ भरतवाक्य नव्हते तर जन्मास येणाऱ्या नव्या जगाची, नव्या संस्कृतीची नांदी होती.

सत्तावीस जून सतराशेसत्त्याऐंशीच्या मध्य रात्री ह्या अकरा वर्षांच्या लिखाणपर्वाची शेवटची ओळ. गिब्बन यानी लिहिली. कागद हातावेगळे करून ते खोलीबाहेर आले. सभोवतालचे सारे जग गुडुप्प झोपी गेलेले होते. ज्या प्रेमाच्या भावनेने त्यांच्या दोस्ताने त्याचे स्वतःचे रहाते घर त्यांना वापरावयास दिले होते, त्या स्वित्झर्लंडच्या सीमेत जगातील एक अद्वितीय अशी वाङ्मयीन कृती संपूर्णत्वाला पोचली होती.

सर्व हयातभर भटकून, अद्वितीय असा ग्रंथ, परदेशी भूमीवर लिहून थकले भागलेले शरीर घेऊन गिब्बन इंग्लंडला परतले आणि सतरा जानेवारी सतराशेचौऱ्याण्णव ह्या दिवशी हा रोमनसाम्राज्याचा इतिहासकार जगाच्या इतिहासात इतिहासजमा झाला.

☆ ☆ ☆





अनुक्रमणिका

# प्लँचेटवर माजी पंतप्रधान

**मृत्यूच ओढवल्यामुळे राष्ट्राला उद्देशून काही बोलण्याचा, काही सांगण्याचा प्रसंग माझ्यावर ओढवणारच नाही अशी माझी खात्री होती ....पण....आजवर मी राष्ट्राला उद्देशून बोललो ते 'नभोवाणीवरून किंवा लालकिल्ल्यावरून....पण आज मात्र मी बोलणार आहे ते लालबागेवरून....**



राजाराम हुमणे

ताश्कंदहून परतल्यावर राष्ट्राला उद्देशून बोलण्याचा माझा मानस होता. परंतु ताश्कंदला वेगळेच रामायण घडले. ताश्कंदला माझा आत्मा अनंतात विलीन झाला आणि माझा देहच फक्त भारतात परत आला, सारे बोलणेच खुंटले.

त्या घटनेला आज तीन वर्षे झाली. राष्ट्राला उद्देशून बोलण्याचे काम दुसऱ्यावर सोपवून मी स्वर्गात कालक्रमणा करू लागलो. माझ्या मृत्यूनंतर (तुमच्या भाषेत सांगायचं म्हणजे 'महानिर्वाणा'नंतर), राष्ट्राला उद्देशून बोलण्याचा माझ्यावर कधीच प्रसंग येणार नाही, अशी माझी खात्री होती. एकतर माझा पार्थिव देह अस्तित्वात नव्हता. दुसरे म्हणजे पाकिस्तानने त्यानंतर भारतावर कधी आक्रमण केले नाही. 'जय जवान जय किसान' या मी राष्ट्राला दिलेल्या घोषणेचेही राष्ट्राला विस्मरण झाले नाही. मृत्यूच ओढवल्यामुळे राष्ट्राला उद्देशून काही बोलण्याचा, काही सांगण्याचा प्रसंग माझ्यावर कधीच ओढवणार नाही अशी माझी धारणा होती. परंतु आज मात्र राष्ट्राला उद्देशून काहीतरी बोलावं, मनाची व्यथा सांगावी असं वाटू लागलंय. आजवर मी राष्ट्राला उद्देशून बोललो ते नभोवाणीवरून किंवा लाल किल्ल्यावरून. आज मी बोलत आहे लालबागहून.

आज राष्ट्राला उद्देशून मी बोलणार आहे ते राष्ट्र संकटात आहे म्हणून नव्हे तर मीच संकटात आहे म्हणून. मला वाटलं मी गेल्यावर लोक मला विसरतील. ते मला विसरले नाहीत ! मोठी आनंदाची गोष्ट. माझ्या पुण्यतिथ्या साजऱ्या होत आहेत. माझी स्मारकं उभारली जात आहेत. मर्त्य माणूस क्वचितच अमर होतो. मी अमर झालो हे माझे सद्भाग्य. इहलोक सोडल्यावर लोक मला विसरलेले नाहीत हे पाहून कुणालाही आनंद व्हायला हवा. तसा आनंद मला निश्चित झाला. त्या आनंदाला वाचा फोडण्यासाठी मी आज बोलत नसून माझ्या दुःखाला वाचा फोडण्यासाठी मी आज बोलत आहे.

लोक लोकप्रिय नेत्यांचा मरणानंतरही पाठपुरावा करतात हे मला माहीत नव्हतं. माझ्या मृत्यूनंतरही माझी लोकाना आठवण रहावी याचे मला वैषम्य कां वाटावे ? परंतु माझी आठवण काढणारे लोक माझा किती छळ करतात याची करुण कहाणी तुम्हाला सांगितली तर तुमच्यासुद्धा डोळ्यात पाणी येईल.

हे लोक जेव्हा माझी आठवण करतात तेव्हा ते माझा अशरीरिणी आत्म्याची भयंकर परवड करतात. जो उठतो तो प्लँचेट लावतो आणि माझी वाट लावतो. रात्री-बेरात्री, वेळीअवेळी हे प्लँचेट मांडून बसतात आणि मला पाचारण करतात. मला 'असेल तेथून' 'नसेल तेथे' जावे लागते. कधी मुंबईला लालबागच्या चाळीत नाहीतर मलबारहिलवरील महालात. कधी दिल्लीला सबजीमंडीतील खोपटात नाहीतर चाणक्यपुरीतील आलिशान बंगल्यात. हिंदुस्थानमधील असं एक गांव नसेल, अशी एक वस्ती नसेल की जिथून मला बोलावणं आलं नाही. भारताचा पंतप्रधान असताना मी अनेक झंझावाती दौरे काढले, अनेक गावाना भेटी दिल्या. परंतु गेल्या तीन वर्षात मी जितक्या गावाना भेटी दिल्या तितक्या मी तीस वर्षे पंतप्रधान राहिलो असतो तरी द्याव्या लागल्या नसत्या ! जणू अकाली निधनामुळे अपुरे



अनुक्रमणिका

राहिलेले हे दौऱ्याचे कार्य भारतीय जनता मृत्यूनंतरही माझ्याकडून पुरे करून घेत आहे.

पंतप्रधान होतो तेव्हाही दौरे मला फारसे आवडत नसत. जनतासंपर्कासाठी, माझ्या लोकांची सुखदुखं जाणून घेण्यासाठी, केवळ नाइलाजास्तव मी बाहेर पडत असे. आता मृत्यूनंतरही लोकांचं असं आपुलकीचं बोलावणं आलं म्हणजे जातो. वाटतं माझ्या लोकाना अजूनही मला काही सांगायचं असेल. प्रांताप्रांतात घडणाऱ्या बऱ्यावाईट घटना कानावर घालायच्या असतील. या देशावर आणि या देशातील जनतेवर मी प्राणापलिकडे प्रेम केले. प्राणोत्क्रमण झाल्यावरही हे प्रेम कमी झाले नाही. नि म्हणूनच लोकांनी साद घातली की मी प्रतिसाद देतो.

आणि काय सांगू प्रत्येक वेळी माझी घोर निराशा होते. उदबत्त्यांच्या घमघमाटात प्लँचेटवर हात ठेवून मला बोलविणारे हे लोक अत्यंत आतुरतेने माझी वाट पहातात. "लाल बहाद्दुरजी! आपण आलात कां ?" असं जीव तोडून विचारतात. प्लँचेटवरचे नाणे 'हो'कडे जाते आणि मला प्लँचेटवर बसलेले ते तिघे-चौघे माझ्यावर प्रश्नांची सरबत्ती करतात. इतकी की लोकसभेत विरोधी पक्षाच्या सदस्यांनी जन्मात कधी केली नसेल! मी प्रश्नांना किंवा पुरवणी प्रश्नांना कधीच घाबरलो नाही. परंतु ते प्रश्न काही तोलामोलाचे असावेत. प्लँचेटवर बसलेले हे रिकामटेकडे लोक मला इतके फालतू प्रश्न विचारतात की या प्रश्नांना उत्तरे देण्यासाठी आपण मरण्यापेक्षा जिवंत राहिलो असतो तरी बरे झाले असते असे वाटावे. एक विचारतो, "मी परीक्षेत पास होईन का ?" दुसरा विचारतो, "वर्ग कोणता मिळणार ?" लेकोहो, परीक्षा देणारे तुम्ही! माझी कां उगाच परीक्षा घेता ? परीक्षा संपली की वधूपरीक्षा सुरू होते. एक विचारतो, "मीनाक्षीचं माझ्यावर प्रेम आहे का ?" दुसरा विचारतो "नीलाक्षी माझ्याशी लग्न करील का ?" प्रेमाच्या फंदात न पडता पदरी पडेल ते पवित्र मानणारेही तरुण असतात. परंतु त्यानाही आपली भावी पत्नी कोण आहे हे जाणून घेण्याची उत्सुकता असते. ते विचारतात, "माझं कुणाशी लग्न होणार ?" "तिचं नाव काय ?" आणि मग प्लँचेटवरच नाणं निरनिराळ्या आद्याक्षरांवरून फिरतं आणि विनूला शेजारची मनूच आपल्या गळ्यात माळ घालणार ह्याची निश्चिती होते.

इकडे मनूही आपल्या मैत्रिणींना बरोबर घेऊन पाटावर स्टोव्ह मांडून बसते. नायलॉन सिफॉनमध्ये ज्यांची शरीरे आणि हेअरस्टाईल्समध्ये ज्यांच्या मनाचे डोनटस् गुंतलेले आहेत अशा या पोरींना अभ्यास करायला वेळ कसा तो मिळत नाही. आणि मग परीक्षा तोंडावर आल्यावर पुस्तक घेऊन बसायच्या ऐवजी त्या घेऊन बसतात प्लँचेट. आम्ही रिकामेच असतो. आम्हाला पाचारण केले जाते आणि "मी पास होणार का ?" हा ठराविक प्रश्न पुसला जातो. विनूप्रमाणे मनूलाही आपल्याला आयुष्यात जोडीदार म्हणून कोण मिळणार याची विवंचना लागलेली असते आणि ती विवंचना दूर करण्यासाठी त्यांना लालबहाद्दूर हवा असतो.

या झाल्या पोरासोरांच्या गोष्टी. परंतु थोरांचे थेरही काही कमी नसतात. मारे सचैल स्नान करून, उदबत्त्या लावून ते प्लँचेट लावतात. पोरांच्या काळज्या ठराविक तशा यांच्या चिंताही ठराविक. "मला नोकरी लागेल का ?" "प्रमोशन कधी मिळणार ?" "निवृत्तीच्या वयानंतर एक्स्टेंशन मिळेल का ?" "मुलीचे लग्न कधी होईल ?" "मुलाला नोकरी कधी लागेल ?" "आज मटक्याचा आकडा कोणता लागेल ?" "उद्या जॅकपॉट मिळण्यासाठी कोणते घोडे लावावेत ?"

प्लँचेटवर येणारा आत्मा म्हणजे कुणी कुडबुड्या ज्योतिषी आहे असेच सर्वजण मानतात. त्यामुळे लालबहाद्दूर शास्त्रीही त्यांना छायाशास्त्री वाटले तर नवल नाही.

मला कुणीतरी सांगितले की एखादा आत्मा एखाद्या घराभोवती घोटाळत राहतो आणि त्या घरातील माणसानी प्लँचेटवर माझ्यासारख्याला बोलावले तर तो त्या आत्म्याला विनंती करून स्वतःच प्लँचेटची सूत्रे हातात घेतो. माझ्या दुर्दैवाने मला तसे कुणी आढळले नाही. त्यामुळे गेले तीन वर्षे रात्रंदिवस प्लँचेटवर जाण्याचे काम मला करावे लागत आहे. मला वाटतं भारताच्या पंतप्रधानकीची जबाबदारी शिरावर असतानासुद्धा मला इतकं काम करावं लागलं नाही.

मृत्यूनंतर माणसाला लोकप्रियतेची एवढी जबर किंमत द्यावी लागते याची मला कल्पना नव्हती. जिवंतपणी गुदमरवून टाकणारे सभा-समारंभ, भेटी-गाठी, दौरे यांनी जीव हैराण झाला होता. वाटलं यातून आपण सुटलो – या जीवघेण्या जंजाळातून आपली सुटका झाली. परंतु लोकानी परलोकातही माझा पिच्छा सोडला नाही. दुखात सुख एवढेच की – इहलोक सोडून गेल्यावरही इहलोकींच्या लोकांची सेवा माझ्या हातून (खरे म्हणजे प्लँचेटवर असलेल्या त्यांच्याच हातून) घडत आहे.

माझं हे भाग्य किंवा दुर्भाग्य माझ्या एकट्याच्याच वाट्याला आले असावे अशी माझी कल्पना होती; परन्तु परवा छत्रपती शिवाजी महाराजांशी गाठ पडली. त्यांनाही प्लँचेटवाल्यांची आमंत्रणे येतात हे ऐकून धक्का बसला. एका नेत्याला सभा-संमेलनांची जास्त आमंत्रणे आली म्हणजे दुसऱ्या नेत्याला बसावा असा हा धक्का नव्हता. हा गोड धक्का होता! माझी आठवण ताजी असल्यामुळे मला अशी आमंत्रणे येणे साहजिक होते. परंतु तीनशे वर्षांचा काल लोटल्यावरही "शिवरायाचे आठवावे रूप" हा रामदासांनी संभाजीला उद्देशून केलेला उपदेश लोकांनीही मानावा हे महाराजांच्या लोकोत्तरपणाचं लक्षण होय. शिवाजी महाराज लोकोत्तर पुरुष होऊन गेले असले तरी लोक मात्र प्लँचेटवर त्यांना तेच तेच सामान्य प्रश्न विचारतात. या लोकांना स्वतःपलिकडची आमच्या सारखी माणसे दिसतात. परंतु स्वतःपलिकडचं मात्र काही दिसत नाही. बोलता बोलता शिवाजी महाराजांनी सांगितले की नाही म्हणायला त्यांच्यासंबंधीही क्वचित काही प्रश्न विचारले जातात. कुणी कधी त्यांना विचारतो,







"तुम्हाला खरोखर दाढी होती का?" हिंदू असून तुम्ही दाढी कां ठेवलीत? दूसरा विचारतो "तुमची भवानी तलवार सध्या कुठे आहे?" त्यांच्या विवाह अशा जन्मतिथीविषयीही कुणी विचारणा करतो. शिवाजी महाराजांनी सांगितलं की त्यांच्या दुर्दैवाने कुणीही इतिहास संशोधक प्लँचेट लावून बसत नाही!

पंडितजींनाही या प्लँचेटवाल्यांनी खूप छळलं. मी जर त्यांच्या मदतीला धावून गेलो नसतो तर त्यांचे कोण हाल झाले असते याची तुम्हाला कल्पनाही करता येणार नाही. इहलोकात माणूस जीवनाला कंटाळला म्हणजे आत्महत्या करून आपली सुटका तरी करून घेतो. तेथे आम्ही आमची सुटका कशी करून घ्यायची? या प्लँचेट-वाल्यांचा त्रास चुकवायचा एकच मार्ग असतो आणि तो म्हणजे धूप घालून प्लँचेट-वर बसलेल्या या लोकांच्या आमंत्रणाला धूप न घालणे. "आपण आलात कां?" असा प्रश्न विचारला की मख्खाप्रमाणे गप्प बसणे. वाट पाहून पाहून ते कंटाळले की मुकाटपणे ते दुसऱ्या कुणातरी आत्म्याकडे वळतील. परंतु जनतेची सेवा करण्यात आमची सारी हयात गेलेली. लोकांच्या आशा-आकांक्षा पुऱ्या करण्यात आम्ही आमचे जीवन वेचलेले. लोकांना दुखावणे आमच्या जिवावर येते आणि म्हणूनच जीव गेला तरी असे जिवापाड काम करावे लागते. पंडितजींचे प्लँचेटबाबत अनुभव माझ्या अनुभवांपेक्षा काही वेगळे नाहीत. परंतु प्लँचेटवाले त्यांना कधी कधी असे काही विचित्र प्रश्न विचारीत की त्यांचा निराकार आत्मासुद्धा शरमिंदा व्हावा. त्यातले 'तसले' प्रश्न म्हणजे "कमलाच्या मृत्यूनंतर तुम्ही दुसरे लग्न कां केले नाही?" "त्यानंतर तुमच्या आयुष्यात दुसरी स्त्रीच आली नाही का?" "तुम्ही लावीत असलेल्या गुलाबाच्या फुलामागचे गुलाबी रहस्य कोणते?"

खरे म्हणजे जॉन केनेडी अमेरिकन. परंतु पंडितजींप्रमाणे हिंदुस्थानातील लोकांचे ते आवडते. प्लँचेटवाल्यांचे ते आराध्यदैवत न होते तरच नवल. पंडितजीं-प्रमाणेच जॉन केनेडीनाही प्लँचेटवर खूप आमंत्रणे येतात. आणि पंडितजींप्रमाणेच जॉन केनेडींनाही विचित्र प्रश्न विचारले जातात. केनेडीना सर्वात अवघड प्रश्न नेहमी विचारला जातो तो हा की, "जॅके-लिन केनेडीचे तुमच्यावर खरोखर प्रेम होते का?" "तुमच्यावर जर तिचे प्रेम होते तर मग तिने दुसरे लग्न कां केले?" या प्रश्नाला बिचारे जॉन केनेडी काय उत्तर देणार? या प्रश्नाचे उत्तर जॅकेलिननेच द्यायला हवे. पण जितीजागती जॅकेलिन प्लँचेटवर कशी येणार?

आश्चर्याची गोष्ट म्हणजे हौतात्म्यामुळे लोकप्रिय झालेले जॉन केनेडी भारतीयांना जवळचे वाटत असले तरी तशाच हौतात्म्या-मुळे लोकप्रिय झालेल्या महात्मा गांधींचे प्लँचेटवाल्यांना फार भय वाटते. महात्मा गांधी, येशूख्रिस्त, मार्टिन ल्यूथर किंग यांना प्लँचेटवर बोलावण्याचे धाडस त्यांना होत नाही.

प्रत्येक माणसाच्या आयुष्यात काही जीवन-रहस्ये असतात. ती रहस्ये रहस्ये रहाण्यातच स्वारस्य असते. ती उलगड-ण्याचा प्रयत्न म्हणूनच कुणी करू नये. प्लँचेटवर तर मुळीच नाही. प्लँचेटवाल्यांनी आपले नेहमीचे काम करावे. आपल्या भावी पतिपत्नीची नावे विचारावीत, परीक्षेतील यशापयशाची चाहूल घ्यावी, भविष्यकाला-तील उज्वलतेबद्दल औत्सुक्य दाखवावे. परंतु दुसऱ्याचा खाजगी जीवनात डोकाव-ण्याचा प्रयत्न करू नये. एवढे जरी पथ्य या प्लँचेटवाल्यांनी पाळले तरी त्यांच्या रुक्ष आणि निरस प्रश्नांना आम्ही वर्षानुवर्षे उत्तरे देत जाऊ.

लोकांचे सार्वजनिक प्रश्न सोडविण्या-साठी आमचा जन्म झाला आणि आता त्यांचे वैयक्तिक प्रश्न सोडविण्यासाठी आमचा मृत्यू झाला. मृत्यू म्हणजे मोक्षाची वाट दाखविणारा सोपान. परंतु या मृत्यूनेच आमची पुरी वाट लावली — सोपानावरून वर जाण्याच्याऐवजी रोज आम्हाला खाली यावे लागत आहे, गल्लीकुचीतून हिंडावे लागत आहे, पोरासोरांच्या पोरकट खेळात सहभागी व्हावे लागत आहे. आमचे हे दुःख वेशीवर टांगण्यासाठीच केवळ आज मी राष्ट्राला उद्देशून बोलत आहे. पूर्वी मी तुमचे प्रेम मागितले ते तुम्ही दिलेत. आज मी तुमच्याकडे दयेची याचना करीत आहे. तुम्ही तुमच्या या लालवर नि लाडक्या जवाहरलालवर दया करा. आयुष्यभर आम्ही तुमची सेवा केली. आता आमच्या-कडून सेवेची अपेक्षा करू नका — निदान असल्या 'पांचट' सेवेची. ● ● ●





....तर त्यावेळी हळदकुंकू देताना नि ते आपल्याही लावून घेताना असं बरं वाटतं की इंद्राघरच्या ऐरावतावर बसून येणाऱ्या नायकानी काय तोरा दाखवावा .... काय डौल मिरवावा ! .....

# दार उघड, गौरादेवी, दार उघड !

डॉ. सरोजिनी बाबर



क्षात्रतेजानं नटलेली, वीरश्रीनं भारलेली, हसतमुख दिसलेली, स्वाभिमानी असलेली आणि अंगापेरानं रसरसलेली लक्ष्मी दारी यायची, म्हणताना त्या दिवशी जरासं कसं भुलल्यागतच झालं. मी आपल्याच अंगाखांद्यावरून हात फिरवला आणि हिचं स्वागत कसं करावं या कोड्यात पडले. हिचं येणं व्हायचं होतं, ते हिच्या माणकांच्या, मोत्यापोवळ्यांच्या, आरोग्य आबादीच्या आणि धनसंपत्तीच्या पावलानी ! आणि ती येणार होती ती 'आली आली गौराय येतच होती' अशा दिमाखानं आमच्या घरचा पुरुषोत्तम शोधीत. त्याच्या वाड्याची वाट पुसत. डाम-डौलानं घराचं जोतं चढत. हाती अमृताचा कलश धरीत. चौसोपी वाड्यातील धन्याचा पालव सावरीत. सौभाग्याचा घेतला वसा ववसीत. घरच्या मालकाचं नशीब उजळीत. तर ती आल्यावर तिला 'या, बसा' कसं म्हणावं आणि नमस्कार कसा घालावा त्याची मेली बेरीज वजाबाकी मनातच ठरेना तर!

एकदा वाटलं शिंपांचा मळा स्वातीनं शिंपीत त्यातले मोती टिपून घ्यावेत आणि दारी नक्षीचं तोरण गुंफावं. पुन्हा विचार आला की, सागर उपडा करावा आणि त्यातली रत्नं वेचून दारी दीपमाळ पाजळीत चंद्रसूर्याचे दिवे लावावेत. पण हे व्हावं कसं ? हट्टीपली-कडच्या गोष्टी जमाव्यातच कशा ? म्हणून मग विचार करीत फार वेळ न बसता दारात पिवळ्या शाईचं दूध तापवावं आणि हळदकुंकवाच्या बोटांचे ठसे काढीत पायघडी घालावी हा बेत जुळण्यासारखा वाटला म्हणून कल्पनेला लगाम घालीत तिथंच थांब म्हटलं. कारण काय की, रातोरात गावोगावचे कारागीर बोलावून ठिणगुल्या उडवीत हिला रत्नजडित अलंकार घडवायचा मोह झाला.

पण बाई ती कोणत्या रूपानं यायची होती म्हणून मापाचे अलंकार करणार होते मी तिच्यासाठी ? कशाचाच पत्ता नव्हता अजून तर ठामपणा घेणार कशा कशात मी ? उगीच आपली नसती तालेवारी फुक्कट गेल्यावर व्हावं कसं ? म्हणून मग न बोलता, न सांगता, अवचितच आपल्या पायानं येणाऱ्या त्या महालक्ष्मीला ती यायच्या आधीच मी दंडवत घातला आणि चिरेबंदी वाड्याच्या आमच्या पायरीवर बसून राहिले. म्हटलं, आता तरी काय नीटपणी सुचलं तर बघावं. तशी मी आपल्या कल्पनेला धवळल्या चांदण्यात हत्ती तसली







झेप घे म्हटलं आणि साक्षीला नवलाख तारांगणांच्या चोरट्या-मेळयाला निमंत्रण केलं तेव्हा कुठं जरासं हायसं वाटलं हं ! नाहीतर अकलेची तारीफ खुंटायचीच वेळ आलीवती ! ....तर काय !

## पहिली ग गौर... भादव्याची

खरंच, या महालक्ष्मीनं यायचंच तर पहिल्यांदा भादव्यातल्या गौरीच्या रूपानं यावं बाई. कारण माहेरवाशिणीच्या डौलानं ती यावेळी येईल न् मग कसं मोकळं मोकळं वाटेल. देवी पार्वती तिच्या-रूपानं यायची म्हणजे भाजीभाकरीचं जेवण आणि प्यायला पिवळ्या साईचं दूध असलं की वास होतं तिला ! ती येतेच अशा गजबारानं की, शंभरवेळा आंब्याच्या बनात तिनं घुटमळावं आणि शंकर मधी मधी येतो तर झाला उशीर अशी कबुली द्यावी. हळदकुंकवाच्या बोटांच्या ठशानं नटलेल्या पाऊलवाटीनं नदीपासून अगर विहिरीपासून तो पार माजघरापावेतो येणाऱ्या हिला "तुझं माहेर दुबळं आहे" म्हणून लाख वेळा शंकरानं हिणवावं. पण ही वस्ताद, "असूंदे असूंदे" म्हणून उत्तर करीत म्हणेल की, "सायीचं दूध घेईन. तुपाची धार घेईन. पाच पक्वान्नांचं ताट जेवीन. हिन्नाच्या का होईना साखळ्या लेवून येईन." त्यामुळं भोळा शंकर रागानं माघारी फिरेल न् ही एकटी येईल. हिचं माहेर घरोघरी. तर ज्याच्या त्याच्याजवळ ही हळदकुंकवाचा पुडचा देईल आणि सौभाग्याच्या गोष्टी करीत राहील. तर काय गंमत की, त्या नादात काय बोलावं न् काय नको ते जाईल विसरून. भान रहायचंच नाही ! त्या कारणानं आपण भलेपणानं महादेवाच्या शब्दाला उतार देतो म्हणून सांगताना ही जशी अभि-मानानं फुगूनच जाईल. अशा वेळी "कुणाच्या मुखाकडं बघून जात होतीस ? कुणाच्या कमरेला विळखा घातला होतास ? पदरानं कुणाला दडवीत होतीस ? " असले प्रश्न करून छळवाद कर-णाऱ्या शंकराला आपण "दिवसाच्या मुखाकडं बघून जात होतो. कळशीच्या कमरेला विळखा घातला होता. विस्तवाला दडवीत होतो" असली उत्तरं देऊन गार केला म्हणून सांगताना तिला अस्मान ठेंगणं होईल. ही जेव्हा तेव्हा आपलंच चालवील अशी. म्हणून घरी आली म्हणजे हिमालयाची ही लेक अशी ऐटीत राहील की विचारू नये. घरातलं चांगलं न् शेलकं तेवढं हिलाच मग. भोवती फराळाची ताटं. लहान् मुलांचा घोळका. अंगाखांद्यावर भर्जरी शालू न् ठळक दागिने. येईल जाईल त्यानं हिला नमस्कार घालावा. मग घरमालकिणीनं प्रसाद देत येणा–जाणारांची विचारपूस करावी. सवाष्णींना हळद-कुंकू द्यावं. रात्रभर गीतं गावीत. खेळ खेळावेत. न्हवणं शिणगारावीत. आणि तिसरे दिवशी हिला दहीभात पोटभर खायला घालून सासरी जा म्हणावं. त्यामुळं या महालक्ष्मीचं येणं कसं मनोहारी ठरतं. घर गजबजून जातं. हौसमौज उफाळून येते. करणी-धरणी सुखावते. आनंदाला उधाण येतं.

## दुसरी ग शारदा, फार तोलामोलाची

घरात शारदा यायची म्हणजे फारच मोठया देवीचं येणं व्हायचं होतं. म्हणून या विद्येच्या देवतेच्या वाटेत मोलाची पायघडी कशी सजवावी याच विचारानं कसं भुलल्यागत झालं. कारण उभ्या दुनियेला शहाणी करणारी ही सरस्वती. तर नुसत्या पानाफुलांच्या पायघड्या घालून तिच्या एकी भागणार नव्हतं. तिच्यापुढं आपला पण उजेड असा पडायला पाहिजे होता की, गौरीबाळीनं नाचत येऊन नवरत्नांचा हार घालीत आपल्याला शाबासकी द्यायला पाहिजे होती ! तरच तिचं आपल्याकडं लक्ष जाणार होतं आणि तिच्याकडून सौभाग्याचा वसा घेणे जमणार होतं. म्हणून मग मी आपल्या स्मरण-शक्तीला सावध हो म्हणाले आणि ठिपक्यांची रांगोळी मनात घोळ-वीत राहिले. पण मेली त्यातली अमुक एकच काढावी असं ठरेनाच तर ! एकदा वाटलं सतरा ठिपक्यांची कोयरी काढावी तर एकदा पंधरा ठिपक्यांच्या बिल्वदळातच जीव गुंतला. मग उभ्या-आडव्या सात ठिपक्यांच्या वेलदोड्यांच्या वेलानं मी सुखावले तर घटका-भरानं सात ठिपक्यांच्या कासवानंही माझी पाठ धरली. तशी मग बारा ठिपक्यांचं ज्ञानकमळ आणि दहा ठिपक्यांचा कारल्याचा वेल मी चटकन् दरवाज्याशी काढून मोकळी पण झाले ! तर सडा घातलेल्या भुंईवर ही रांगोळी अशी उठून दिसली की, काय सांगू ? रेघा कशा रेखीव न् ठळक आल्या आणि रांगोळीवर हळदकुंकूदेखील असं बेतासबात बसलं की शाबासच म्हणावी !

## लक्ष्मीचा ग दिमाख, झगमगाट चोहीकडे

होता होता मग प्रचंड मेघगर्जना झाली न् मुसळधारीनं जिकडं तिकडं हस्ताचा गारवा आणून सोडला. तशातच नवरात्र बसलं. दसरा उजाडला. शिलंगण झालं आणि वीस एक दिवसानी दिवाळीनं येणं केलं. तशी फराळा-आराळाच्या जोडीनंच येतेल्या लक्ष्मीच्या पूजेचा पण विचार केला. धनदौलत घेऊन येणाऱ्या या वयेच्या स्वागतासाठी घरातल्या शेलक्या कारागिरीला हुडकून काढून ठेवली आणि तिला रेशमी आसन गुंफीत बसले. त्यासरशी आणिक एक विचार मनात आला. काचेचे रंगीत मणी घेतले. सुई दोरा आणला न् मग दारीचं तोरण गुंफलं. मण्यांचे रंग जुळवून झाडावर बसलेल्या राघुमैना काढल्या, अंबारीचा हत्ती काढला, भावली बसलेला उंट काढला आणि तोरण असं नटवलं असं नटवलं की सौराष्ट्रातल्या मोतीकलेच्या नक्षीचीच आठवण यावी ! अगदी.

या राजसलक्ष्मीला बसायला चौरंग कसला असावा म्हणून मग मनी विचार घोळला तर राजस्थानातल्या मांडनाची आठवण आली. सोळा पाकळ्यानी फुललेल्या पणत्या बरोबर बसतील अशा सोळा वाटयांचा गालिचा काढला आणि मोकळी झाले. त्यावेळी अशी शोभा आली, अशी शोभा आली की, विचारू नये. नव्हे धनलक्ष्मी घरी यायची तर तिला इथं रहावं वाटेल असा डामडौल नको करायला ?

मनासारखं असं काय काय जरासं जुळलं म्हणताना ऐन दिवा-ळीत मग लाह्या बत्ताशांचा प्रसाद आणून मापटंभर हळदकुंकू मावतील असे जुने-पुराणे लाकडी करंडे सामानातून बाहेर काढले. स्वच्छ करून त्यात पंढरीचं हळदकुंकू घातलं आणि म्हटलं की, मळवट भरून मनासारखं लेवूदे लक्ष्मी हे हळदकुंकू, आणि आम्हाला पण






अनुक्रमणिका

लावूंदे आपल्या राजविंड्या गोऱ्या हातानं. मग बघूया तिच्या हातातली रत्नजडित कंगणी ढाळ देतीय का आमच्या कपाळीचं कुंकू! ती जशी लक्ष्मी तशाच आम्हीपण. नसेना मग रत्नमाणकांची रास आमच्या घरात! सुखासमाधानाची नजर सगळ्यात वरचढच की हो! तर! हळदकुंकवामुळं आम्हाला जशी शोभा तशीच आमच्यामुळं हळदकुंकवाला पण! एकमेकांचा ठळकपणा एकमेकानी राखला तरच खरी शोभा. म्हणून मी त्या धनलक्ष्मीला सरळ सांगितलं की, बयो, आमची ऐपत ओळखूनच यायची तशी ये. उगाच खोटा डोलारा नको न् कुणाचं उसणंपासणं पण नको दिसायला. तर त्यावेळी तिला हळदकुंकू देताना न् ते आपल्याही लावून घेताना असं बरं वाटलं की इंद्राघरच्या ऐरावतावर बसून येणाऱ्या बायकानी काय तोरा दाखवावा!

होय, ऐरावतावर बसून येणाऱ्या बायका भारी तोलामोलाच्या. श्रीमंतांच्या. कुबेरांच्या घरच्या. आमची न् त्यांची बरोबरी व्हावी कशी? पण हळदकुंकवाला येताना हा भेदभाव कुणी मानीतच नाही. सगळ्या सवाष्णी सारख्या. बरोबरीच्या. म्हणून संक्रांतीच्या ववशाला येताना लहान मोठेपणा कुणी मानीत नाही का कुणी त्याचा तेगारापण दाखवीत नाही. पण ववसायला कुणी कुणाकडं कसं जायचं हा ज्याचा त्याचा प्रश्न असतो.

घरच्या कुलस्वामिनीला ववसायला जाणाऱ्या थोरामोठयांच्या बायका हत्तीवरून, पालखीतून अगर अब्दागिरीखालून जायच्या पूर्वी! त्यामुळं गांधारी ऐरावतावरून येऊन ववसून गेली हा बोभाटा एवढा व्हायचा की, बोलायची सोय नाही.

## संक्रांतीचा बाई तोराच न्यारा

ताज्या सुगडाला हळदकुंकू लावून, फुलं वाहून, त्यात ऊस, गाजर, गव्हाची ओंबी, भुईमुगाच्या शेंगा, विवटया, पावटयाच्या शेंगा, ओला हरभरा असलं काय काय घालून आणि तिळगूळ देऊन ववसा पुजला की, मोठी बहार येते. एकमेकींनी एकमेकीना हे सुगड देताना आपला पदर त्याला लावीत अंगा खांद्यावर तीनदा तो टेकून "आला आला ववसा सीताचा. सौभाग्याचा, मानापानाचा. आला ववसा नगरी, घ्या पाडून पदरी" असली भाषा करायची आणि आपल्या सौभाग्याला उदंड आयुष्य लाभावं म्हणून ववसत बसायचं म्हणजे भारी भाग्याची गोष्ट. अशा वेळी घरिवी नव्या उमेदीनं ववसायला आली म्हणजे शेतकऱ्याचं नशीब उजाडतं. गुळाची ढेप आणि तिळाचं पोतं घेऊन तिला तिळगूळ द्यायचे. भोंबी पुनवेला तिची पूजा करायची. पुरणाचा नैवेद्य दाखवून. पंचारती ओवाळून. हळदकुंकू वाहून. तशी मग आपल्या कुंकवाला असं तेज येतं की, पहाणारानं बघतच रहावं. नव्हे दंडभुजानी रेटीत शेतातल्या पिकानं टचाचून भरलेली पोती घरी आणीन म्हणणाऱ्याच्या करणीला बरकत यायची नाही तर मग कुणाच्या? म्हणून तर माझ्यासारखी पावसानं फळी धरायचा अवकाश की लगेच आपल्या बंधुराजाच्या शेतात पाण्याचे आगर करून सोडायला मेघराजाला विनवून मोकळी होते.

आणि घरची पट्टी अशी पिकवून सोड म्हणते की, जनलोकात बोल-बाला झालाच पाहिजे! त्यामुळं वांधावरच्या लक्ष्मीला शंभरदा पाया पडून मी सांगून टाकते की, आमच्या माणसांचा धरला पालव सोडू नको. मग तिच्या पूजेच्यावेळी गावभरच्या बायका गोळा होऊन घडाभर का हळदकुंकू लागेना! आमचा वाडा पुसत ही लक्ष्मी आली पाहिजे एवढं मला कळतं! मग तिच्यासाठी जीव गहाण टाकायचा होईना घटकाभर! कसं?

आमच्या घरात तर लेकबाळीला पहिल्यांदा दिवस गेले आणि पहिलंवहिलं बाळराज घरात आलं की, जीव गहाण टाकीत हौसमौज करायची चालच आहे म्हणा. तर! घरात असेल नसेल ते गोळा करून डोहाळजेवण अशा झोकात होईल की, त्यावेळच्या हळद-कुंकवाचा आणि कोडकवतिकाचा भडिमार बघतच रहावा. शप्पथ! आवडीनिवडीच्या पदार्थांनी भरलेलं ताट जेवणारी ही राजसबाळी हिरवा साज लेवून केळीनारळीच्या बागेत फळं खात झोपाळ्यावर बसली म्हणजे तिच्या आईचा मनमोर आनंदानं डोलू लागतो आणि सोनियाचा दिवस आला म्हणून सारं घरदार सुखावतं. तीच गोष्ट घरात वारसं निघाल्यावर. जसा काय कृष्णजन्मच नंदा घरी झालाय असा थाटमाट. दारी सनई चौघडा वाजेल, सवाष्णी पायरीवर घागरी ओततील, गावभर साखर जाईल, मानापानाच्या गोळा होतील, पाळणा सजेल, घुगऱ्या-मुटके शिजतील, दारी पानांचं तोरण येईल, सोनाराच्या घरी बिंदुल्या घडवताना ठिणगुल्या चमकतील आणि घरादारात हौसमौज धाधावून येईल. अशा वेळी सटवाई जिवती या लक्ष्मींची झोकात पूजा होईल आणि गीतांच्या झोकात बाळाचं नाव ठेवलं जाईल. त्यावेळचं हळदकुंकू अशा हौसेने नटतं की, कुळस्वामिनीचा पण मानपान ऐटीत व्हावा, घरंदाजपणानं नटावं आणि थोरल्या बायकांची हौस भागावी.

## आणि शीतल ग, ती चैत्रगौरी

परवा आमच्या घरी चैत्रगौरीचं हळदकुंकू होतं तर अशाच एक दोघी राजस्थानच्या आलेल्या. बरोबर त्यांची लहानगी लेक. अशी नटून सजून आलीवती की बस्स!. म्हणताना तिच्या आईनं तिला पोटाशी धरताना गणगौरीच्या गोष्टी ऐकवल्या. होळीनंतर चैत्रातल्या चतुर्थीपर्यंत त्यांचेकडे गणगौरीची पूजा होतें असं ती बाई म्हणाली. तर त्यावेळचा पोषाख ही चिमुरडी लेवून आली होती असं कळलं. त्यासरसी पानाफुलांच्या झुवक्यानं सजवलेला तांब्या डोईवर घेऊन गीतं गात नदीवर जायचं आणि येताना भरला तांब्या घेऊन यायचं. त्या परीनं गणगौर आणायची. तिच्या चमकत्या नेत्रात बघत तिच्याजवळ मागणं करायचं, "हे आई, गौरीदेवी, आपलं दार उघड. माझ्यावर प्रसन्न हो. उदार मनाचा, मोठ्या काळजाचा, हौसेचा, आणि आमच्यावर प्रेमाचा वर्षाव करणारा असा पिता आम्हाला दे. आमच्यावर जीव ओवाळून टाकणारी, आमच्यावर मायेचं छत्र धरणारी अशी आई आम्हाला दे. कृष्णासारखा भाऊ दे. चतुराईनं वागणारी प्रेमळ भावजय दे. सुभद्रेसारखी वहीण दे. आणि चांगला जिरेटोप लेणारा, महालात मजेनं बसणारा, गढ चढून जाणारा, घोड्यावर स्वार होणारा असा देखणा वीर पुरुष पती म्हणून दे."

● ● ●

---

[पान २६ वरून– **अगा जे...**]

**मृत्युंजय**—वरं झालं. पण तुला आताच्या आता एका नव्या काम-गिरीवर जावं लागणार आहे. तावडतोव तयारी कर.

**गुणा**—व्हय सायेव. आत्ताच्या आता तयारी करते. (गुणा जाते)

(फोन वाजतो. मोरू फोन घेतो.)

**मोरू**—हॅलो! कोण पोलिस इन्स्पेक्टर! मी मोरू वोलतोय. वावूजी थोडे थकलेत! अर्जन्ट काम आहे – काय– काय म्हणता काय– म्हणजे मघाशी पकडून दिलेला दादा देशमुख नावाचा इसम हा वेड्याच्या इस्पितळातून पळालेला वेडा आहे—कमाल झाली. चेष्टा नाही—दोन वेडे पळालेत—दुसरा सापडला नाही. दोघांपैकी एकजण गळ्यात पिस्तुल घालून स्वतःला दादा देशमुख म्हणवतो व दुसरा कुवड्या घालून स्वतःला दिगंवर देशमुख म्हण-वतो. खरं! दोघेही वेडे आहेत—काय रहस्यकथावाचून त्याना वेड लागलेलं आहे? वापरे! वावूजी! नाही तुम्हाला नाही—थँक्यू (फोन ठवतो.)

**मृत्युंजय**—ते मी ओळखलंच होतं.

**मोरू**—वावूजी आता मलाच वेड लागणार. म्हणजे खून, मृत्यू-पत्र, दादा– दिगंवर काही नाही. सारंच खोटं. सारा वेडयांचा बाजार —कमाल झाली—वावूजी दुसरा वेडा पकडून द्या असं पोलिस म्हणताहेत. (मृत्युंजय तोंडावर हॅट ठेवून मागे मान टाकून वसतो.)

(गुणा येते)

**गुणा**—सायेव झाली माझी तयारी. सांगा कुठं जायाचं. आन् कौंच कामगिरी हाय त्येवी सांगा. सायेव, तुमी वोलत कां नाय.

**मोरू**—गुणा—वावूजीना त्रास देऊ नकोस. अग मघाचे ते दोन इसम होते ना ते वेडयांच्या इस्पितळातून पळून आलेले दोन वेडे होते. रहस्यकथा वाचून वेड लागलंय त्यांना.

**गुणा**—काय चेष्टा करताय का मस्करी! का याडवीड लागलं तुमाला.

**गुणा**—चेष्टा नाही. अग खून, मृत्यूपत्र म्हणजे त्यांचे वेडाचे झटके होते. हो की नाही वावूजी?

**मृत्युंजय**—(तोंडावरची हॅट काढून) होय ते मी केव्हाच ओळखलं होतं.

● ● ●

## लठ्ठपणा कमी करण्याचा उपाय

"काय करावं लठ्ठपणा कमीच होत नाही!", एक लठ्ठ माणूस आपल्या मित्राला म्हणाला.

"ह्याला अगदी सोपा उपाय आहे. खूप खा म्हणजे वजन कमी होईल", त्याच्या मित्राने सल्ला दिला.

"काहीतरीच सांगतोस!", तो लठ्ठ माणूस म्हणाला.

"असं पहा. खूप खाल्लं की माणूस आणखी लठ्ठ होतो. लठ्ठपणा वाढला की आळस वाढत जातो. आळस वाढला की काम करावसं वाटत नाही. तसं वाटू लागलं की खाण्याचे वांधे होतात आणि खायला मिळालं नाही. की वजन कमी होऊ लागतं."

* * *

## अक्कलेचा वाटा

"आपला बाळू खूपच हुशार आहे नाही? मला वाटतं त्याला ही अक्कल माझ्याकडून मिळाली असावी." पतिमहाराज म्हणाले.

"मलाही तसंच वाटतंय. कारण माझी अक्कल बिलकुल कमी झाल्याचं दिसत नाही", पत्नीने उत्तर दिले.

* * *

## खरी योग्यता

मॅनेजर – काय, आपण चार महिन्यात सहा जागी नोकरी केली ?"

उमेदवार – होय, पण यात माझी योग्यतात दिसून येते नाही का? की माझी मागणी किती जबर आहे !

* * *

## खरा राजकारणी

"खरं पहाता मीच राजकारणी आहे", हेमंत आपल्या मित्रास म्हणाला.

"कसं ?" मित्राने विचारले.

"त्याचं असं आहे, एक तारखेपासून सात तारखेपर्यंत माझे खिसे गरम असल्यामुळे मी 'भांडवलदार' असतो. सात ते पंधरा तारखेपर्यंत 'प्रजासमाजवादी' असतो–उसने घेऊन आपले कसे तरी भागवून घेतो. पंधरा ते वीस तारखेपर्यंत 'कम्युनिस्ट' असतो–महागाईमुळे पिळवणूक होत असल्याबद्दल ज्याला-त्याला सांगत असतो. पंचवीस ते तीस तारखेपर्यंत कोणीही उसने देत नाही. त्यामुळे कधी साधे जेवण, तर कधी उपास करावे लागतात. म्हणजेच त्यावेळी 'गांधीवादी' असतो.

* * *

## फिट्टंफाट

डॉक्टर – तुम्ही दिलेला चेक परत आला आहे.

पेशंट – गंमतच आहे म्हणायची, माझा तापहि परत आला आहे.

* * *




## विद्यार्थ्यांची जातच तशी !

एका कॉलेजच्या हॉस्टेलमधल्या विद्यार्थ्यांनी जेवण चांगले मिळत नसल्याबद्दल प्राचार्यांकडे तक्रार केली. प्राचार्यांनी आचाऱ्याला बोलावणं पाठवलं आणि त्याची कानउघाडणी केली.

"जेवण जर सुधारलं नाही, तर तुला नोकरीवरून काढून टाकीन!", प्राचार्य शेवटी म्हणाले.

"साहेब", तो सैंपाकी उत्तरला, "तुम्ही त्या मुलांचं बोलणं मनावर घेऊ नका. माझ्याजवळसुद्धा ते तुमच्या भिकार लेक्चरबद्दल बोलत असतात."

* * *

## आता नको !

आपल्या घराजवळच्या मळ्यात देखरेख करताना मोतीमल मारवाडी पाय चुकून विहीरीत पडले. पाण्यात गटांगळ्या खात असताना त्यांनी शेटाणीस हाक मारली.

"थांबा, थांबा", ती ओरडली, "मळ्यातल्या गड्यांना हाक मारते."

"चूप, ओरडू नकोस!" बुचकळ्या मारताना मोतीमल ओरडले, "वाजले किती?"

"साडे बारा झाले असतील", शेटाणीने अंदाजाने सांगितले.

"मग थांब थोडा वेळ. एक वाजेपर्यंत मी असाच एका दगडावर उभा राहतो. न्याहरीची वेळ झाली की हाक मार त्यांना," मोतीमल म्हणाले.

* * *

## आभार

इडली-सांबार खाताना सांबारात एक बटण सापडलेलं पाहून बाळूकाका चांगलेच तडकले. त्यांनी ओरडून वेटरला बोलावलं आणि त्याच्या पुढं ते आदळीत म्हटलं, "हे पाहिलंस !"

"थँक यू", वेटर ते बटण उचलून घेत म्हणाला, "माझ्याच पँटचं आहे ते !"

**— श. शि. पेंढारकर**








अनुक्रमणिका

# कुटुंब नियोजन हा जनता कार्यक्रम



डॉ. झाकीर हुसेन

आपला कुटुंब नियोजन कार्यक्रम जगात हाती घेण्यात आलेल्या अशा कार्यक्रमापैकी सर्वात मोठा आहे यात शंका नाही. आपली लोकशाही तत्वे व मूल्ये न दवडता आपण हा कार्यक्रम कशा तऱ्हेने अंमलात आणतो याकडे जगाचे डोळे लागून आहेत. आरोग्य कार्यक्रमाच्या यशानंतर, झपाटयाने वाढणाऱ्या लोकसंख्येच्या प्रश्नास अनेक विकसनशील राष्ट्रांना तोंड द्यावे लागत आहे किंवा लागणार आहे अशा राष्ट्रांना आपल्या कुटुंब नियोजन कार्यक्रमाचे यश मार्गदर्शक ठरणार आहे. यामुळेच आपणा सर्वांवर अधिक जबाबदारी येऊन पडली आहे.

व्यक्तिशः व भारताचा राष्ट्रपती म्हणून या प्रश्नास मी सर्वात अधिक महत्त्व देतो. व्यक्ती म्हणून आणि म्हणूनच राष्ट्र म्हणून हा प्रश्न आपणा सर्वांस भेडसावितो. गेल्या २१ वर्षात अनेक सामाजिक-आर्थिक क्षेत्रात आपण पुष्कळच प्रगती व विकास साध्य केला आहे. आपण शेतकी उत्पादन वाढविले आहे आणि कृषि-क्षेत्रातील कोंडी फोडण्यातही खचित्‌च यश मिळविले आहे. औद्योगिक उत्पादन वाढले आहे आणि अनेक पटींनी शैक्षणिक सोयीतही वाढ झाली आहे. प्राथमिक आरोग्य सेवांच्या विकासामुळे आणि कॉलरा, देवी व मलेरियासारख्या संसर्गजन्य रोगांना आळा घालण्यात आपण मिळविलेल्या यशामुळे मृत्यूचे प्रमाणही नाटयपूर्णरीत्या खाली आले आहे. चांगल्या प्रकारच्या वैद्यकीय उपचारांमुळे, १९४७ साली असलेली संभाव्य सरासरी आयुर्मर्यादा २७ वरून आज ५० वर्षावर गेली आहे. मात्र याच कालावधीत जनन प्रमाणात फारच थोडी घट झाली.

याचाच परिणाम म्हणून आज आपणास भरमसाट लोकसंख्या वाढीच्या प्रश्नास तोंड द्यावे लागत आहे. १९४७ मध्ये आपली लोकसंख्या ३४.४ कोटी होती ती आज ५२.८ कोटीवर गेली आहे. या प्रचंड संख्या वाढीमुळे विविध क्षेत्रातील प्रगतीचे लाभ पुरेसे पडत नाहीत व परिणामतः राहणीमान उंचावण्याच्या आपल्या प्रयत्नात अडथळा येतो. म्हणूनच मृत्यूचे प्रमाण आणखी खाली आणण्याच्या प्रयत्नांबरोबरच जनन प्रमाणात पुष्कळ घट घडवून आणण्याचे प्रयत्नही करणे जरूरीचे आहे. हे आपण करू शकलो नाही तर येत्या तीस वर्षात आपली लोकसंख्या दुप्पट होऊन १०० कोटीवर जाईल आणि समुद्राच्या लाटांबरोबर वाळूत काढलेली अक्षरे जशी पुसून जातात तसे आपल्या सर्व विकास प्रयत्नांचे होईल.

परंतु निराश होण्याचे कारण नाही. गेल्या तीन वर्षातील आपल्या प्रयत्नांमुळे देशांत लोकसंख्येच्या प्रश्नाबाबत प्रचंड जागृती झाली आहे, हे सांगताना मला आनंद वाटतो, देशाच्या विविध भागात हाती घेण्यात आलेल्या अभ्यासावरून दिसून आले आहे की, बहुसंख्य लोक कुटुंब नियोजनाच्या गरजेबाबत जागरूक झाले आहेत व दोन अगर तीन मुले असलेल्या छोटया कुटुंबांचा संकेत अधिक प्रमाणावर मान्यता पावू लागला आहे.

देशातील ९ कोटी संततीक्षम जोडप्यांपैकी ११ टक्के जोडपी छोटया व सुखी कुटुंबासाठी कुटुंब नियोजनाच्या या ना त्या पद्धतीचा वापर करीत आहेत. हे यश उल्लेखनीय आहे. ही सामाजिक क्रांती घडवून आणण्यात या क्षेत्रातील ज्या हजारो कर्मचाऱ्यांनी उत्साहवर्धक प्रयत्नांनी प्रचंड कार्य करून दाखविले त्यांचा मला अभिमान वाटतो.

तीन वर्षापूर्वी आम्ही हा कार्यक्रम व्यापक प्रमाणावर हाती घेतला तेव्हा त्याच्या यशस्वितेबद्दल आमच्यापैकी अनेकांच्या मनात शंका होती. परंतु आज या क्षेत्रात क्रांती घडत असल्याचे दृश्य मला दिसते. या कार्यक्रमाला मिळालेली गती या क्षेत्रात स्थित्यंतर घडवून आणील याची मला खात्री वाटते.

या प्रसंगी मला एक इशारा द्यावासा वाटतो. गेल्या तीन वर्षात आपण या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत वेगाने प्रगती केली असली तरी आपल्याला अजून बरीच वाटचाल करावयाची आहे व तोपर्यंत आपल्या प्रयत्नात शिथिलता येऊ देता कामा नये. आपले विकास प्रयत्न अर्थपूर्ण ठरावे या दृष्टीने म्हणजे आपल्या श्रमांची फळे आपल्यापैकी प्रत्येकाला पुरेशा

(पृष्ठ ५२ पहा)










# प्रत्यक्ष कुटुंब नियोजन करणारांकडून कुटुंब नियोजनाचा प्रसार

गंगाराम निवाजीराव पाटील हे सुरतमधील एका कापूस गिरणीत कोष्टी काम करतात. मुलांवर त्यांचे खूप प्रेम आहे. परवाच त्यांनी आपल्या मुलांसाठी एक तिचाकी आणून दिली! गंगारामना चार मुले आहेत. पाठीमागल्या सीटवर आपल्या भावंडाला घेऊन वडील मुले तिचाकीवरून खोलीभर फिरू लागली की, खोलीत स्वर्ग अवतरतो. या स्वर्गाची किल्ली आपल्या हातात आली आहे याबद्दल गंगाराम आणि त्यांच्या पत्नीला आनंद वाटतो.

स्वतःच्या अनुभवावरून गंगारामची कुटुंब नियोजनाच्या फायदेशीरपणाबद्दल खात्री पटली आहे आणि आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना नि मित्रांनाही या अनुभवाचा फायदा त्यांनी करून दिला आहे. नटु जम्नादास आणि गुलामनबी मन्सुरी या दोन मित्रांचा सुटसुटीत व सुखी संसार पाहून आपल्या वाढत्या कुटुंबालाही मर्यादा घातली पाहिजे ही जाणीव गंगारामला झाली आणि एकदा एका सभेतील एका प्रभावी वक्त्याच्या भाषणाने देशासाठी आपण कुटुंब नियोजन केले पाहिजे ही त्यांची खात्री पटली. तो वक्ता म्हणाला होता की, देशाचे अन्नोत्पादन गेल्या काही वर्षात खूप वाढले आहे. परंतु लोकसंख्येच्या प्रचंड वाढत्या वेगापुढे ही सारी प्रगती विफल ठरते. गंगारामला आधीच चार मुले होती. वाढत्या तोंडामुळे कुटुंबाचे जसे हाल होतात तसेच देशाचेही होणार हे त्याला पटले आणि पत्नीच्या सल्ल्याने त्याने स्वतःची शस्त्रक्रिया करून घेतली.

### तब्येती सुधारल्या

आता गंगारामच्या घरात पूर्वीपेक्षा जास्त सुखसमाधान नांदते. त्याच्या पत्नीची तब्येत खूपच सुधारली आहे. आपल्या एका मुलाला डॉक्टर नि दुसऱ्याला इंजिनिअर करण्याचा त्याचा मनसुबा आहे.

गंगारामने आतापर्यंत सुमारे १०० मित्रांना कुटुंब नियोजनासाठी प्रवृत्त केले आहे. मोहम्मदमिया रसूलमिया खान हा त्यापैकीच एक! दरमहा १५० रुपये कमाई असलेला तोही गिरणी कामगारच होता. चार मुलांचा संसार रेटणे त्याला कठीण होत होते. त्याची थोरली मुलगी शादी होऊन सासरी गेली तरी त्याला मुले होतच होती. गंगारामच्या सल्ल्याने त्यानेही शस्त्रक्रिया करून घेतली. शस्त्रक्रियेबद्दल उगीचच त्याच्या मनात भीती होती. परंतु प्रत्यक्ष अनुभवावरून शस्त्रक्रिया किती सोपी असते आणि वैवाहिक सुखात त्यामुळे काहीही अडचण येत नाही, अशी त्याची खात्री पटली.

### आधी केले मग सांगितले

कुटुंब नियोजनाचा संदेश या अशा प्रत्यक्ष कुटुंब नियोजन करणारांकडूनच अधिक प्रभावीपणे होत आहे. मणीलाल ठाकूरदास राणा हा असाच एक गरीब जरीवाला आहे. ६० जणांना शस्त्रक्रियेसाठी त्याने प्रवृत्त केले आहे. मणिलालला सहा भाऊ आहेत. त्यामुळे मोठ्या कुटुंबातील अडचणीतून तावून सुलाखून निघाल्यामुळे स्वतःचे कुटुंब एका मुलापुरतेच त्याने मर्यादित ठेवले आहे.

'आधी केले मग सांगितले' या ब्रीदाच्या या अशा कार्यकर्त्यांच्या सहकार्यामुळेच सुरतच्या इंडियन ज्युनियर चेंबरने १९६७ सालचे अखिल भारतीय ज्युनिअर चेंबर्सचे पहिले पारितोषिक पटकाविले आहे.

औद्योगिक कामगार नि गरीब वर्गाबरोबर उच्च व मध्यमवर्गीयानाही कुटुंब नियोजनाचे महत्त्व पटलेले आहे. सुरतच्या एक सुप्रसिद्ध प्रसूतीतज्ज्ञ व शस्त्रवैद्य डॉ. कु. निकुंजलता तिजोरीवाला यांच्या मते या मध्यम व उच्च वर्गीयांच्या निःशुल्क मदतीपेक्षा खाजगी डॉक्टरांवर जास्त भरवंसा असतो. कुटुंब नियोजनासाठी ते पैसे खर्च करू शकतात व स्वखुषीने करतातही. डॉ. तिजोरीवालांच्या रुग्णालयात स्त्रियांच्या शस्त्रक्रियेसाठी राहण्यासाठी ५० रुपये व स्वतंत्र खोलीसाठी १५० रुपये आकार घेतात. परंतु तरीही अनेक लोक त्यांच्याकडे येतात. दरवर्षी सुमारे ४०० शस्त्रक्रिया त्या करतात. इतर खाजगी शस्त्रवैद्यांचाही असाच अनुभव आहे.

* * *

# संतती नियमनासाठी लूप हेच उत्तम साधन

सन १९६७–६८ मध्ये नागपूरच्या शहरी व ग्रामीण विभागात अनुक्रमे ७९८ आणि ८२८ लूप बसविण्यात आले. अशाप्रकारे लूप बसविण्याच्या कार्यक्रमात सबंध महाराष्ट्रात नागपूरने ७ वा क्रमांक मिळविला.

नागपूरच्या डागा इस्पितळात डॉ. श्रीमती बल्लाळ द्वारा संचालित कुटुंब नियोजन विभाग प्रसिद्ध आहे. १९६७–६८ मध्ये या इस्पितळात ३१४६ प्रसूत्या झाल्या. येथे प्रसूतीस येणाऱ्या प्रत्येक स्त्रीची कुटुंब नियोजनविषयक काही समस्या असली तर त्याकडे






लक्ष देऊन योग्य तो सल्ला देण्यात येतो. ३१४६ प्रसूत झालेल्या स्त्रियांपैकी ७३६ स्त्रियांना शस्त्रक्रियेची गरज होती, कारण या स्त्रियांना तीन अगर त्यापेक्षा जास्त अपत्ये होती. ७३६ स्त्रियांपैकी ४३२ स्त्रियांनी शस्त्रक्रिया करून घेतल्या व बाकीच्या २२८ स्त्रियांनी लूप बसवून घेतले.

प्रसूतीनंतर लूप बसविण्याच्या कामात डागा इस्पितळ निष्णात आहे. येथे प्रसूतीसाठी येणाऱ्या प्रत्येक स्त्रीस प्रसूतीनंतर लूप बसवून घरत पाठविण्यात येते. या इस्पितळाची ही खास विशेषता आहे.

## सामान्यतः लूपमुळे त्रास होत नाही

डॉ. श्रीमती बल्लाळ यांच्या मते स्त्रियांना लूप बसविल्यानंतर जो तात्पुरता त्रास होतो तो थोड्याच दिवसात नाहीसा होतो. बऱ्याच स्त्रियांना लूप बसवून घेतल्यानंतर त्रास होत नाही, यास्तव सर्वसाधारण स्त्रियांनी लूप बसवून घ्यावा अशी त्या शिफारस करतात.

मातृसेवा संघ हे नागपूर शहरातील दुसरे मोठे प्रसूती गृह असून तेथे लूप बसविण्याच्या कार्यक्रमांचा बारकाईने अभ्यास होत आहे. मातृसेवा संघाच्या डॉ. श्रीमती के. वानकर यांच्या एका पाहणी-नुसार लूप बसवून घेतलेल्या ५०० स्त्रियांपैकी २४ ते २७ वयो-गटातील स्त्रिया सर्वात जास्त होत्या. यानंतर २१ ते २३ आणि २८ ते ३० वयोगटातील स्त्रियांकडून उत्तम प्रतिसाद मिळाला. या तीन वयोगटातील स्त्रियांची टक्केवारी ६५.२८ इतकी भरते. मॅट्रीक उत्तीर्ण स्त्रियांत कुटुंब नियोजनाविषयी तीव्र जाणीव आढळली. तसेच निरक्षर स्त्रियांतही कुटुंब नियोजनविषयी कल्पकता आढळली व त्या लूप बसवून घेण्यास राजी असल्याचे दिसले. दोन अपत्ये असणाऱ्या स्त्रिया पाळण्यातील अंतर वाढविण्यासाठी विशेष उत्सुक आहेत. सरकारी कर्मचाऱ्यांकडूनही उत्साहवर्धक प्रतिसाद मिळत आहे.

डॉ. श्रीमती वानकर यांच्या पाहणीवरून एक निष्कर्ष निघतो की, स्त्रियात लूप बसवून घेण्याची आवड निर्माण झाली असून त्या अधिक संख्येने लूप बसवून घेत आहेत.

नागपूरच्या उपरोक्त दोन महिला डॉक्टरांच्या अभ्यास व पाहणीनुसार हेच सिद्ध होते की, सर्वसाधारण स्त्रियांना लूप हेच उत्तम साधन आहे.

* * *

# कुटुंब नियोजनाचा सल्ला व सोयी कुठे मिळतात ?

कुटुंब नियोजनाचा सल्ला कुणाकडून घ्यावा? यासंबंधी साधने कुठे मिळतात ? हे असे प्रश्न प्रत्येक सुबुद्ध दांपत्याच्या मनात येतात व त्यासंबंधी आपापसात ते चर्चा करतात.

काही दांपत्ये नवविवाहित असतात, त्यांना अनेक कारणामुळे मुले थोडी उशीराने, तीन-चार वर्षांनी व्हावीत असे वाटते. एक मूल झालेल्यांना दुसरा पाळणा थोडा लांबेल तर हवे असते तर दोन मुले झालेल्यांना वेगळाच सल्ला हवा असतो. दोघांपैकी एक मुलगा व एक मुलगी असली तर तिसऱ्या अपत्याबाबत ते एवढे उत्सुक नसतात. परंतु दोन्ही मुलगे वा दोन्ही मुली असल्या तर अजून एकदा प्रयत्न करावा परंतु त्यासाठी ३–४ वर्षांचा अवधी असावा अशी त्यांची इच्छा असते.

या अशा दांपत्यांना संतति-नियमनाची साधने योग्य ठरतात. अशावेळी काही वेळा पत्नी लूप बसविण्याचा निर्णय घेते. लूप एकदा बसविले की, त्यात दररोजची कटकट नसते. लूप बसविले आहे की नाही याची जाणीवही राहात नाही. वैवाहिक सुखात त्यामुळे काहीही आडकाठी येत नाही. लूप बसविण्यासाठी कुटुंब नियोजन केन्द्र घराजवळ असणे सोईचे असते कारण लूप बसविल्या-वर अधूनमधून स्त्रियांची तपासणी होणे आवश्यक असते. पुरुषांनी 'निरोध' वापरण्याचे ठरविले तर नियमितपणे त्यांना ही साधने मिळाली पाहिजेत.

तीन किंवा अधिक मुले असलेल्यांना शस्त्रक्रियेसंबंधी माहिती हवी असते. त्यासाठी सर्वात धाकटे मूल थोडे मोठे होणे आवश्यक असते. तोपर्यन्त निरोध, लूप किंवा पोटात घेण्याच्या गोळ्या उपयोगी असतात. शस्त्रक्रिया करायची असेल तर पतीची करावी की पत्नीची असा प्रश्न दांपत्यापुढे येतो. स्त्रियांनी शस्त्रक्रिया बाळंतपणात केली तर सोईची ठरते. बाळंतपणाच्या विश्रांती-बरोबरच शस्त्रक्रियेसाठी सात दिवस रुग्णालयात राहणे सोईस्कर ठरते. ही शस्त्रक्रिया मोठी असते परंतु आजच्या प्रगत साधनामुळे ती सोपी झाली आहे. पुरुषांची शस्त्रक्रिया ही तर खूपच सोपी असते. पण ही सर्व माहिती कुठे मिळते ? अर्थात आपल्या कौटुंबिक डॉक्ट-रांना सल्ला विचारता येईल. परंतु हा सल्ला व सोयी मोफतदेखील मिळू शकतील. जिल्ह्याच्या ठिकाणी जिल्हा आरोग्य अधिकारी किंवा जिल्हा कुटुंब नियोजन अधिकारी ही सर्व माहिती तत्परतेने व निःशुल्क देतात. बहुतेक जिल्ह्यांच्या ठिकाणी सरकारी रुग्णालये आहेत तेथे ही माहिती व साधने मिळतात. शस्त्रक्रियाही विनामूल्य होतात. शहरातून नगरपालिका तसेच काही स्वयंस्फूर्त संघटनांमार्फत कुटुंब नियोजन केन्द्रे चालविण्यात येतात. ग्रामीण भागात प्रत्येक प्राथमिक आरोग्य केन्द्राखाली कुटुंब नियोजन सल्ला देण्यासाठी तीन उपकेन्द्र असतात. या सर्व केन्द्रात तुम्ही सल्ला विचारायला गेलात तर नंतरची सर्व काळजी तेथील कर्मचारी घेतात.

काही वेळा गावकरी या कामात पुढाकार घेतात व त्यांच्या सहकार्याने जिल्हा आरोग्य अधिकारी गावातच शिबिरे भरवितात व तज्ज्ञ शस्त्र-वैद्यांकडून शस्त्रक्रिया केल्या जातात.

स्त्रियांची शस्त्रक्रिया थोडी कठीण असते. त्यासाठी वेगळी सोय करावी लागते, काही प्रसूति-गृहात सरकारने अशा शस्त्रक्रियांसाठी खाटा राखून ठेवल्या आहेत. महिलांना या प्रसूति-गृहात आपले नाव नोंदवता येईल. त्याखेरीज फिरती केन्द्रे असतात. त्यामार्फत लूप बसविण्यात येतात. 'निरोध'ही मोफत पुरविण्यात येतात. क्वचित या फिरत्या केन्द्रातून नसबंदीच्या शस्त्रक्रियाही केल्या जातात.

कुटुंब नियोजनाचा सल्ला व सोयी उपलब्ध करून देणारी केन्द्रे ही अशी देशभर विखुरली आहेत. लाल त्रिकोणाची खूण जेथे जेथे आहे तेथे तेथे हा सल्ला तत्परतेने व मोफत मिळू शकेल.

* * *






## कुटुंब नियोजन कार्यक्रम
# उद्दिष्टपूर्तीसाठी प्रभावी प्रयत्न

भारतात कुटुंब नियोजन कार्यक्रमास १९६६ पासून चांगली चालना मिळाली आहे. गेल्या १२ वर्षात ४५ लक्ष संतति-प्रतिबंधक शस्त्रक्रिया करण्यात आल्या व २४ लक्ष लूप बसविण्यात आले. गेल्या दोन वर्षात (यापैकी) २७ लक्ष शस्त्रक्रिया झाल्या व १५ लक्ष लूप बसविण्यात आले. म्हणजे पहिल्या दहा वर्षातील कार्यापेक्षा गेल्या दोन वर्षात अधिक कार्य झाले.

कौल व लक्ष्य यांचा विचार करून या कार्यक्रमाचा केलेला विस्तार व कार्यक्रम राबविण्यासाठी मिळालेले विविध संघटनांचे उत्तम सहकार्य यामुळे हे यश प्राप्त झाले आहे.

### एकंदर लक्ष्य

सन १९७८ पर्यन्त जननप्रमाण २३-पर्यन्त कमी करणे हे कुटुंब नियोजन कार्यक्रमाचे एकंदर लक्ष्य आहे. आर्थिक विकासावर लोकसंख्या वाढीने पडणारा ताण कमी करण्यासाठी लोकसंख्यावाढीच्या प्रमाणात घट घडवून आणणे व छोट्या कुटुंबाना उत्तेजन देऊन सामाजिक बदल घडवून आणणे हे या कार्याचे उद्दिष्ट आहे. हे साध्य करण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे. त्यादृष्टीने ५६,००० खेड्यात व ३०००शहरात राहणाऱ्या प्रजोत्पादनक्षम वयोगटातील १० कोटी जोडप्यांपर्यन्त पोहोचू शकेल अशी एक संघटना उभारण्यात आली आहे.

### साधनाबाबत स्वातंत्र्य

लोकांना हवी ती संतति-प्रतिबंधक साधने उपलब्ध करून दिली तर गर्भधारणेच्या प्रमाणात घट घडवून आणण्याचे उद्दिष्ट साध्य होईल हे लक्षात घेऊन त्याप्रमाणे पाऊल टाकण्यात आले आहे. अनेक प्रयोगसिद्ध पद्धती लोकांपुढे ठेवण्यात आल्या आहेत. नवविवाहितांसाठी निरोध (कंडोम्स), एखादे मूल असेल तर पाळणा लांबविण्यासाठी लूपचा वापर व दोन किंवा तीन मुले असतील त्यांच्यासाठी शस्त्रक्रिया या पद्धती उपलब्ध करण्यात आल्या आहेत. अर्थात त्याबाबत अंतिम निवड करण्याचे जोडप्यांनाच संपूर्ण स्वातंत्र्य देण्यात आले आहे.

घरोघरी जाऊन गृहिणींची भेट घेणे आणि त्यांना कुटुंब नियोजनाचे महत्त्व पटवून देणे हेच या प्रचारिकेचे दैनंदिन कार्य

### उच्चाधिकार मंडळ

खेडे व विकास गट पातळीपासून मध्यवर्ती सरकारच्या पातळीपर्यन्त विविध उपसमित्यांद्वारे कुटुंब नियोजन कार्यक्रमास मार्गदर्शन मिळत असते. याशिवाय कुटुंब नियोजन कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत येणाऱ्या अडचणींचा विचार करण्यासाठी व त्यावर उपाययोजना करण्यासाठी एका उच्चाधिकार मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचा वेग वाढविण्यासाठी हे मंडळ विविध योजनांना मंजुरीही देते. प्रशासन व्यवस्थेत या मंडळाची नियुक्ती विशेष स्वरूपाची आहे: कारण कार्यक्रमातील अडचणींचे निवारण करण्यासाठी व त्यास चालना देण्यासाठी या मंडळाकडे जादा अधिकार सुपूर्द करण्यात आले आहेत.

### आर्थिक पाठबळ

कुटुंब नियोजन कार्यक्रमास पूर्ण आर्थिक पाठबळ उपलब्ध करून देण्यात आले आहे. पहिल्या पंचवार्षिक योजनेत या कार्यक्रमासाठी ६५ लक्ष रुपयांची तरतूद करून देण्यात आली होती. ती दुसऱ्या व तिसऱ्या पंचवार्षिक योजनातून अनुक्रमे ४.९७ कोटी रुपये व २७ कोटी रुपयांपर्यंत वाढली. रक्कम नव्हे, तर तिचा वापर महत्त्वाचा असल्यामुळे कार्यक्रमाच्या प्रगतीची उपयुक्तता रकमेच्या संदर्भात आजमावण्यात येते. त्यादृष्टीने प्रशासनाच्या विविध पातळीवर तपासणी अधिकारी काम करीत असतात.

कार्यक्रमास त्वरित यश लाभावे म्हणून सधन जिल्हे व विभाग निवडण्यात आले असून त्यात औद्योगिक विभागांचाही समावेश करण्यात आला आहे. देशातील एकूण ३३५ जिल्ह्यांपैकी ५१ जिल्ह्यात देशाची १/४ लोकसंख्या आहे. या जिल्ह्यात विशेष प्रयत्न केले जातात व उर्वरित जिल्ह्यात नेहमीप्रमाणे अंमलबजावणी कार्य चालू असते. लोकांना कुटुंब नियोजनास प्रवृत्त करण्यासाठी पारंपारिक परिणामकारक माध्यमांचाही अवलंब केला जातो.

### उलटा त्रिकोण

कुटुंब नियोजन केन्द्राचा पत्ता विचारण्याचे काही लोक टाळतात हे लक्षात घेऊन कुटुंब नियोजन सेवांचे बोधचिन्ह म्हणून उलटा लाल त्रिकोण ठरविण्यात आला आहे. या चिन्हाच्या साधेपणामुळे काही अन्य देशही त्याच्या स्वीकाराबाबत विचार करू लागले आहेत.

### दूरदर्शी नियोजन

दूरदर्शी नियोजन हा कुटुंब नियोजन कार्यक्रमाचा कणा आहे. १९७१ पर्यन्त लोकसंख्या ५६.३ कोटीवर व १९८१-पर्यन्त ७२.३ कोटीवर जाण्याचा संभव आहे तोपर्यन्त सार्वजनिक आरोग्य सोयीमध्येही होणाऱ्या सतत वाढीमुळे मृत्यूचे प्रमाण आणखी घटेल. १९६१–६६ या





अनुक्रमणिका

कालावधीत असलेले १६.३२ हे मृत्यूचे प्रमाण १९६६–७१ मध्ये १४.५३ पर्यन्त घसरेल व १९७१–७६ दरम्यान १२.८९- पर्यन्त खाली येईल असा अंदाज आहे. जनन प्रमाणातही काही बदल होईल व ते १९७१–७६ पर्यन्त २३.९० पर्यन्त खाली येईल अशी अपेक्षा आहे.

### संशोधन

कार्यक्रम आखताना संशोधन व मूल्यमापन कार्याचे महत्त्व लक्षात घेण्यात आले आहे. वस्तुतः कुटुंब नियोजन कार्यक्रमाचे धोरण व दिशा यावरच संशोधनाचा प्रभाव पडला आहे. १० जीवशास्त्रीय वैद्यक संशोधन केन्द्रे, १० प्रचार व कृती याबाबतचे संशोधन प्रकल्प, व १० डेमोग्रॅफिक संशोधन केन्द्रे यात होणाऱ्या संशोधनाच्या निष्कर्षांचा उपयोग सतत या कार्यक्रमासाठी केला जातो.

### मूल्यमापन

कार्यक्रमाची अंमलबजावणी योग्य दिशेने होत आहे किंवा नाही तसेच अंमलबजावणीच्या विविध टप्प्यात कोणत्या तऱ्हेनें प्रयत्न करावेत म्हणजे निर्धारित लक्ष्ये गाठली जातील. यासाठी कार्यक्रमाचे मूल्यमापन करण्यावर भर दिला जातो.

मूल्यमापन तज्ज्ञांची तुकडी पाठविण्याबावत संयुक्त राष्ट्राकडे विनंती करणारा भारत हा पहिलाच देश आहे. मूल्यमापन तज्ज्ञांच्या पहिल्या तुकडीने १९६६ मध्ये सादर केलेल्या अहवालातील शिफारशींची पूर्णतः अंमलवजावणी करण्यात आली आहे.

संयुक्त राष्ट्रांची दुसरी एक तुकडी लवकरच भारतात येईल अशी अपेक्षा असून तत्संबंधी प्रारंभिक कार्य सुरू झाले आहे. याशिवाय, नियोजन मंडळाच्या कार्यक्रम मूल्यमापन संघटनेने कार्यक्रमाचे एकदा मूल्यमापन केले असून पुन्हा मूल्यमापन करण्यासाठी पावले उचलली आहेत.

सातत्याचे प्रयत्न व जनजागृती या द्वारे १९७८ पर्यन्त जननप्रमाण दरहजारी २३- पर्यन्त खाली आणण्याचे उद्दिष्ट गाठणे शक्य होईल अशी उमेद आहे. * * *

# कुटुंब नियोजन म्हणजेच समाज सुधारणा

कुटुंब नियोजनाची छाप जनमानसावर कशी बसली आहे याचा जर एकाद्याला अभ्यास करावयाचा असेल तर त्याने नाशिक जिल्ह्यातील मालेगावचे उदाहरण समोर ठेवावे. या शहराची लोकवस्ती १ लक्ष ७५ हजार आहे. १९६७–६८ साली या शहरात २०४३ पुरुषांवर व १२७ स्त्रियांवर शस्त्रक्रिया झाल्या. याशिवाय ५२ स्त्रियांना लूप वसविण्यात आले.

या शहरात नगरपालिकेने चालविलेले एक कुटुंब नियोजन केन्द्र आहे. याशिवाय मेडिकल असोशिएशनने एक खाजगी केन्द्र चालविलेले आहे. डॉ. श्रीमती हिरा कानडे ह्या नगरपालिका केन्द्राच्या चालिका आहेत. आपल्या जीवनाचे एक ध्येय म्हणून त्यांनी कुटुंब नियोजनाच्या कामाला स्वतःस वाहून घेतले आहे. या कामी बऱ्याच लोकांचे मन वळविण्यात त्या यशस्वी झाल्या आहेत. गेल्या २ वर्षात त्यांनी २७०० पुरुषांवर शस्त्रक्रिया केल्या. एवढेच नव्हे तर मालेगावातील प्रत्येक जाति-जमातीच्या व वर्गाच्या लोकात त्यांचे जाणे-येणे असल्याने त्या जोरावर त्यांनी प्रशंसनीय यशही संपादन केले आहे.

श्री. महमद सबीर हे ३६ वर्षे वयाचे एक व्यापारी आहेत. ते मालेगाव नगरपालिकेचे एक सदस्य आहेत. त्यांना ३ मुलगे व २ मुली मिळून एकूण ५ अपत्ये आहेत. त्यांच्या पत्नीवर २ वर्षापूर्वी संतति-प्रतिबंधक शस्त्रक्रिया करण्यात आली. चौथ्या मुलाच्या जन्मानंतर यापुढे कुटुंब विस्तार थांबविला पाहिजे ही जाणीव श्री. महमद सबीर ह्यांना प्रथम झाली. त्यावर ते गंभीरपणे विचारही करू लागले. त्यांच्या मते ३ मुलांच्यावर अधिक मुले होऊ देणे बरोबर नाही. तसेच स्त्रियांवरील शस्त्रक्रियेपेक्षा पुरुषांवरील शस्त्रक्रियाच ते अधिक पसंत करतात. कुटुंब नियोजन त्यांच्या मते समाज सुधारणेचा एक मार्ग असून त्यावर त्यांचा कटाक्ष व संपूर्ण विश्वास आहे. कुटुंब नियोजनामुळे आई-वापांना आपल्या मुलांकडे अधिक चांगले लक्ष देता येते याबद्दल आता त्यांची खात्री झालेली आहे.

सामाजिक सुधारणेचा मार्ग जाणकार लोकच आपल्या उदाहरणाने दाखवितात. मालेगावमधील श्रीमती बद्रुन्निसा ह्या वर्गात मोडतात. आपल्या १० व्या बाळंतपणासाठी त्या वाडिया हॉस्पिटलच्या प्रसूति-गृहात दाखल झाल्या. तोपर्यंत संततिनियमनाबाबत त्या अगदी अनभिज्ञ होत्या. प्रसूती-गृहातील १० दिवसांच्या वास्तव्यामुळे त्यांना ही जाणीव प्रकर्षाने होऊ लागली. आपल्या जिवावर नेहमी बेतणाऱ्या या बाळंतपणाना कायमची रजा देण्याचा त्यांनी निर्णय घेतला. आपल्या पतीशी याबाबतीत त्यांनी हितगुज केले. तो त्याला तयार होईना. पण पत्नीचा निर्धार पक्का होता. पतीनेही नंतर शांतपणे विचार केल्यावर त्यालाही बद्रुन्निसाचे म्हणणे पटले व तो अखेर तयार झाला. बद्रुन्निसा ह्या आता एक सुखी स्त्री आहेत.

श्री. अब्दुल सलाम अब्दुल रझाक ह्यांचाही कुटुंब नियोजनावर विश्वास आहे. आपल्या मुलांना चांगले शिक्षण मिळावे अशी जर पालकांची इच्छा असेल तर त्यांनी आपल्या कुटुंब विस्ताराला आवर घातला पाहिजे असे ते म्हणतात. त्यांनाही १० मुले आहेत. त्यामुळे आपल्या नशिबाला ते सारखा दोष देत असतात. तीनपेक्षा अधिक मुले कुठल्याही जोडप्याला असता कामा नयेत असे त्यांचे आता मत बनले आहे.

* * *

# यानंतर मला पुन्हा मूल केंव्हा व्हावे

बालकाच्या विकासाच्या दृष्टीने त्याच्या जीवनातील पहिल्या चार-पांच वर्षांचा काळ फार महत्वाचा असतो असं डॉक्टर्स सांगतात. मातेच्या आरोग्याच्या दृष्टीनेही, पहिल्या अपत्याच्या पाठीवर तिला निदान तीन-चार वर्षांनतरच पुन्हा मूल होणे इष्ट असते. संतती नियमनाच्या अनेक साध्या सुरक्षित व परिणामकारी पद्धती आजमितीस उपलब्ध आहेत. आता अपत्यजन्म ही योगायोगाची अथवा नशिबाची गोष्ट राहिलेली नाही. पाहिजे तेव्हाच आपणांस अपत्य होऊ देणे आता तुमच्या हातचे आहे.

मोफत सल्ला व सहाय यांच्यासाठी नजीकच्या कुटुंब-नियोजन केंद्रात विचारणा करा.






(पान ४६ वरून—कुटुंबनियोजन)

प्रमाणात चाखावयास मिळण्याच्या दृष्टीने प्रत्येक दांपत्याने दोन किंवा तीन मुलांपेक्षा अधिक मुले नकोत असा निर्णय घेतला पाहिजे. ज्यांना तीन मुले असतील त्यांनी अधिक मुले नकोत असा निर्णय घेतला पाहिजे.

मातेचे आरोग्य चांगले राहावे व मुलांचे योग्य संगोपन व्हावे या दृष्टीनेही होणारी २—३ मुले ठराविक अंतराने झाली पाहिजेत. ९ कोटी दांपत्यांपैकी प्रत्येक दांपत्यापर्यंत हा संदेश आम्ही पोहोचविला पाहिजे व त्यांना छोट्या कुटुंबांचा संकेत मान्य करण्यासाठीच नव्हे तर तो कृतीत उतरविण्यासाठी प्रवृत्त केले पाहिजे. तरच आपले विकास प्रयत्न फलदायी ठरतील.

हे आव्हान देणारे कार्य आहे. केवळ सरकारी प्रयत्नांनी ते यशस्वी होणार नाही. लाखो दांपत्यांच्या निर्णयावर व कृतीवर त्याचे यश अवलंबून आहे. म्हणूनच हा कार्यक्रम जनता कार्यक्रम बनला पाहिजे. इतरांच्या विचारावर प्रभाव पाडू शकणाऱ्या व्यक्तींवर या दृष्टीने विशेष जबाबदारी येऊन पडते. विचार परिवर्तन घडवून आणणाऱ्या सर्वच क्षेत्रातील पुढाऱ्यांनी या कार्यक्रमात सक्रीय भाग घेतला पाहिजे असे मला सुचवायचे आहे. छोट्या सुखी कुटुंबाच्या संदेशाचा प्रसार करून कठीण प्रश्नावर मात करण्यासाठी राष्ट्रास ते मदत करू शकतात.

म्हणूनच मी सर्व देशबांधवास हा कल्याणकारी कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करण्याचे आवाहन करतो. अशा प्रयत्नातूनच आपला भविष्यकाळ अधिक निरोगी, सुखी व बलवान होऊ शकेल.

[राष्ट्रपतींच्या 'आकाशवाणी' वरील भाषणावरून] ● ● ●

# रजत-महोत्सवी वर्षानिमित्त वाचकांसाठी खास योजना

'दीपावली'च्या वाचकांसाठी एक खास योजना आम्ही येथे जाहीर करीत आहोत. या योजनेत भाग घेऊन आमच्या वाचकाना 'दीपावली'च्या रजत-महोत्सवात सहभागी होण्याचे आवाहन करीत आहोत.

रजत-महोत्सवी वर्षात प्रसिद्ध होणाऱ्या म्हणजे मार्च १९६९ या अंकापासून फेब्रुवारी १९७० पर्यंतच्या अंकापर्यंत दर महिन्याला एक कूपन प्रसिद्ध करण्यात येईल. त्या त्या महिन्यातील दर्जेदार साहित्य कोणते (कादंबऱ्या सोडून) हे वाचकांनी आपल्या पसंतीनुरूप त्या महिन्यातील प्रसिद्ध झालेल्या कूपनावरच नमूद करून ते कूपन आमच्याकडे पाठवावयाचे आहे. या कूपनामधून सर्वात अधिक मते ज्या लेखकाच्या साहित्याला पडतील त्याला 'दीपावली'कडून त्या त्या विषयाचे 'रौप्यपदक' देण्यात येईल.

शिवाय 'दीपावली'कडे भरून आलेल्या कूपनातून पंचवीस कूपने लॉटपद्धतीने काढण्यात येतील आणि त्यांना एक वर्षपर्यंत 'दीपावली'चे अंक भेट म्हणून पाठविण्यात येईल. याशिवाय काही भाग्यवान स्पर्धकांना रोख पारितोषिकेही देण्यात येतील. (त्याबाबतचा तपशील नंतर जाहीर होईल.)

येथे कापा

**दीपावली एप्रिल १९६९**

**अंकातील दर्जेदार साहित्य**

**खास योजनेचे कूपन**

१. **सर्वोत्तम कथा**: ____________

२. **सर्वोत्तम लेख**: ____________

**(विनोदी, ललित इत्यादी)**: ____________

३. **सर्वोत्कृष्ट कविता**: ____________

४. **अन्य साहित्य**: ____________

**(वैचारिक लेख, प्रवासवर्णन इ.)** ____________

**कूपन पाठविणाराचे नाव** ____________

**संपूर्ण पत्ता** ____________

____________

**या योजनेबाबतच्या सर्व अटी मला मान्य आहेत.**

____________

**स्वाक्षरी**

येथे कापा

या योजनेत भाग घेणाराना खाली नमूद केलेले नियम बंधनकारक राहतील :

१. दर महिन्याच्या अंकात प्रसिद्ध होणाऱ्या कूपनवरच आपले मत नमूद करून ते (फेब्रुवारी १९७० अखेरपर्यंत केव्हाही) आमच्याकडे पाठविले पाहिजे.

२. बाराही महिन्यांची कूपने एकत्र करून त्यातून एकंदर पंचवीस कूपने लॉटने काढण्यात येतील.

३. एका स्पर्धकाला एकाच कूपनाचे पारितोषिक मिळेल.

४. या योजनेचा अंतिम निर्णय पुढील वर्षाच्या वर्षारंभ अंकातून (मार्च १९७० च्या अंकात) प्रसिद्ध होईल आणि तो सर्व स्पर्धकांना बंधनकारक राहील.

५. एका व्यक्तीला कितीही कूपने भरून पाठविता येतील. मात्र ती कूपने 'दीपावली'तूनच प्रसिद्ध झालेली असली पाहिजेत.

कूपन पाठविण्याचा पत्ता: संपादक 'दीपावली', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई-४.

रौप्य महोत्सवी प्रयोगाच्या निमित्ताने

# साहित्यसंघाचा नवा 'खेळ'

" मेजर चंद्रकान्त " ह्या रूपांतरित नाटकाच्या मागोमाग मुं. म. साहित्यसंघाच्या नाटयशाखेने एक नवा, आगळया चेहऱ्या-मोहऱ्याचा नाटय प्रकार 'पति गेले ग काठेवाडी' ह्या नावाने सादर केला. साहित्यसंघाच्या नाटयशाखेच्या वतीने आजवर सादर करण्यात आलेल्या यशस्वी (वा पडेल) नाटकांपेक्षा ह्या नाटयप्रकाराची प्रकृती आगळी व मराठी रंगमंचाला तशी नवी अशीच आहे असे म्हटल्यास वावगे ठरू नये. संपूर्ण नाटक, संपूर्ण तमाशा ( वा चालू भाषेत लोकनाटय ) वा तमाशाचा वग, नृत्य-नाटय वगैरे एकाच नावाने चालू खेळाला संबोधता येणे नाही. साहित्यसंघाने ह्याला 'खेळ' असेच नाव दिले आहे. आणि ह्या 'खेळा' चा 'मेळ' ठीकठाक जमला असल्याने प्रेक्षकांचे भरपूर रंजन होते. 'नावा' चा वाद खेळायला त्यांना मुळी सवडच मिळत नाही. लोक म्हणतात " खेळ तर खेळ. त्या खेळाला मिसळीची चव असल्याने (व मिसळ हे आजचे लोकप्रिय खाणे असल्याने) आम्हाला चालेल " आणि लोकांना हा खेळ रुचला, पटला व पचला आहे असे जाणवत होते. ही खिचडी, मिसळ 'खपणार'से दिसते.

'पति गेले ग काठेवाडी'च्या कथेला आधार आहे तो एका प्रसिद्ध मराठी लावणीचा. त्या लावणीचा पाया 'पातिव्रत्य' हा आहे. आणि जडणघडण मात्र एखाद्या कल्पनारम्य लोककथेची आहे. पार्श्वभूमी पेशवाईची. पेशवाईतला मराठी सरदार वसुली-साठी काठेवाडी जायला निघतो. त्याचे आपल्या पत्नीवर उत्कट प्रेम असते आणि तिचेही त्याच्यावर. म्हणून तुम्ही मुलुखगिरीवर असाल त्या काळात तुम्ही सांगाल त्या गोष्टी मी करीन. सांगाल त्या अटी पाळीन असे म्हणते. वारंवार आग्रह केल्याने तिची कसोटी पाहण्यासाठी तो तिला तीन विचित्र अटी घालतो. पहिली अट असते विनखर्चाची हवेली उठवून दाखविणे, दुसरी अट तो काठे-वाडी असतानाच तिला मूल व्हावे, पण ते त्याच्याशिवाय दुसऱ्या कुणाचेही असू नये. ह्या तीन अटी ऐकल्याबरोबरच ह्या खेळातल्या '[illegible]चा'बद्दल मनात कुतुहल जागृत होते. आणि चतुर व पतिपरा-यण पत्नीने त्या तीन्ही अटी ज्या पद्धतीने पूर्ण केल्या ते पाहून माणसे हर्षभरित होतात. त्यासाठी तिने लढविलेल्या युक्त्या पहात असताना रंगत वाढत जाते. आणि काठेवाडी जे काही "नाटय" घडते ते तर पहात असताना माणसे खदखदतच राहतात. नाटक आणि वग, नांदी आणि गणगवळण. लोकनृत्य आणि लोकगीतें यांच्या अनेकविध धाग्यांनी ही लोककथा फुलत जाते. मराठा सरदार काठेवाडी जातो. तेव्हा त्याच्या पगडीवर एक सुगंधी तुरा त्याच्या पत्नीने खोवलेला असतो. तो तुरा गंध देत राहतो. पण सुकत मात्र नाही. ह्या सुगंधी तुऱ्याच्या ताजेपणाचे रहस्य त्याच्या पत्नीच्या चारित्र्यात आहे हे काठेवाडी रावाला त्याच्या मुनीमजीकडून कळते. तेव्हा " तो तुरा सुकलाच पाहिजे" ह्या विचाराने तो पछाडला जातो. त्यासाठी तो मुनीमजीला महाराष्ट्रात पाठवतो. सरदारपत्नीचे लक्ष स्वतः-



कडे वेधून घेण्यासाठी तो अनेक युक्त्या योजतो. त्या प्रयत्नात तो स्वतःच्या खर्चाने हवेली बांधून देतो. त्या हवेलीत लग्न लागते ते मात्र सरदार पत्नीच्या दासीचे. पण मुनीमजी मात्र खूष असतो. काठेवाडी जातो. पण तरीही सुगंधी गजरा मात्र सुकत नाही. तेव्हा काठेवाडी राव ह्यात काही तरी गफलत असली पाहिजे हे ओळखतो. मध्यंतरी वेषांतर करून सरदार पत्नी काठेवाडी जाते. सरदाराला मोहविते आणि तो परत येतो तेव्हा त्याच्यापासूनच झालेले मूल त्याला दाखविते. कथेत नाटय आहे. सस्पेन्स आहे. आणि वगाची रंगत वाढविण्यासाठी इतर लोकगीतें, लोकनृत्यादि मसाला. ती गाणी समजत नसली तरी नृत्य प्रकार समजू शकतो. काठेवाडी वाडा, देऊळ, नदीकाठ, पेशवाई हवेली, आणि शेवटची 'फुकटची' हवेली इत्यादि नेपथ्य प्रकार मोहक वाटले. ( ते पडद्यांचेच आहे हे प्रेक्षकांना दाखविण्याचा प्रयत्न मुद्दाम झाला की सहज ? ) त्याहून हास्यास्पद प्रकार मेण्यांचा झाला. मेण्याची फक्त बाहेरची चौकट इकडून तिकडे नेण्यात आली. पडदा झिरझिरित ( व काही ठिकाणी खुल्लम खुल्ला ) असल्याने ती 'चौकट' एके-रीच आहे हे लक्षात आले. नदी किनारा, देऊळ वगैरेचा पडदाही भडक वाटला. प्रकाशयोजना मात्र चांगली वाटली. अगदी पहिला पेशवाई वाडयाचा बाह्य व आंतरभाग कलापूर्णरीत्या मांडलेला वाटला. सुरुवातीला नांदी–गणगवळण रंगते. पण पुढे जी काही 'गाणी' म्हणून म्हटली जातात त्यांना तशी रंगत कमीच. विशेषतः 'पति गेले काठेवाडी' हे जे त्यातले "थीम-सॉंग" आहे ते तर चाल व गायन ह्या दोन्ही दृष्टींनी फारसे परिणामकारक होत नाही. अग-दीच बेचव व निर्जीव वाटते. त्याबाबत पुन्हा नव्याने काही प्रयत्न झाला तर एरव्ही रंगतदार असलेला हा खेळ अधिक रंजक होईल असे वाटते. काठेवाडी नाच कलापूर्ण वाटला. नाद, ताल, कृति, टिपऱ्यांचे ठोके, हालचाली ह्या 'चोख' वाटल्या. अर्थातच तो नाच 'पॅच'सारखा वाटतो. तो तसा वाटू नये त्यासाठी एखादा प्रसंग वा प्रसंग सूचन करता आले तर ते अधिक बरे ठरावे.

ह्या प्रयोगाची खरी रंगत वाढविली आहे ती दत्ता भट यांनी ! त्यांचे काठेवाडी, धेडगुजरी ( भाषा व वेषदृष्टयाही ) रूप डोळयात व मनात(ही) भरते. दत्ता भट हा एक फार गुणी, हुन्नरीचा व फार मोठया कर्तृकीचा व ताकदीचा नट आहे असे माझे मत आहे. सुदैवाने त्यांच्या कारकीर्दीच्या (चित्रपट व नाटय) प्रारंभकाला-पासून त्यांची कामे पाहण्याचे भाग्य मला लाभले असल्याने त्यांच्या-तल्या कलागुणांची जाण मला आहे. ह्या खेळात त्याच्या गुणांची फार मोठी पावती ते प्रेक्षकांना देतात. फड जिंकतात. त्यानंतरचा क्रम

लागतो तो ललिता केंकरे यांचा. सरदारपत्नीची शालीन, पतिपरायण, आत्मविश्वासी, लाडिक, मोहक आणि तरीही कर्तव्याबाबत कठोर अशी भूमिका त्या चांगली पेश करतात. त्यांच्या 'गतिमान' व्यक्तित्वाला मात्र ह्या भूमिकेत एक संयत पण 'डिग्निफाइड' असे रूप लाभले आहे. मीना सुखटणकर ही एक नवीन पण गुणी कलाकार. एकसुरी संवाद पद्धतीचा दोष सोडला, तर तिनेही काम चांगले केले. कमलाकर सारंग सरदार 'शोभले' चांगले. पण 'नाटकी' वाटले. त्यांच्या अभिनयाला साचेबंद रूप तर येत नाही ना अशी एक भीति वाटते. मनी ठसला तो गुणी कलाकार अरविंद देशपांडे! त्यांचे 'देखणे' रूप प्रारंभी फसवून गेले. सोंग बेमालूम! वठवले चांगले. 'बावळट' मुनीमजी लाजवाब होता. संवाद सुंदर. दिग्दर्शन बरे!!

## मी सूर्याची रोहिणी

काही विषय कधी शिळे होत नाहीत. त्यातले काव्य, नाट्य, मानवी मनाची गुंतागुंत, त्यातले नाजुक अनुबंध कधीच शिळे होत नाही. नवनवीन माणसे त्या विषयांच्या वेडाने पछाडली जातात. त्यातले नाजुक भावबंध उकलून दाखविण्याचा प्रयत्न करतात. हे सारे प्रयत्न नेहमी, संपूर्णतया यशस्वी होतातच असे नाही. पण त्यामुळे त्या विषयाचे वा त्या प्रयत्नकर्त्यांचे महत्व काही कमी होते असे वाटत नाही. कर्ण, ययाति-देवयानी, शिवराय, बाजीराव पेशवे, माधवराव पेशवे, राम, कृष्ण हे असे काही सनातन विषय! बाजीराव पेशवे ह्यांच्या जीवनातले काव्य आणि नाट्य असेच अनेकांना आव्हानीत आले आहे. मस्तानी यवन कन्यका होती, नर्तिका होती, गायिका होती, ह्यामुळेच तो संघर्ष निर्माण झालेला होता असे नाही. ती सती-साध्वीसारखी निष्ठेने राहिली. आपल्या प्रेमविषयाला तिने समर्पण दिले. परंतु त्या समर्पणाला योग्य दाद देण्याच्या भावनेतून बाजीरावाने तिला दिलेले मोठेपण व तिच्या मुलाच्या व्रतबंधाचा आग्रह ह्यातून खरा संघर्ष फुलला. मस्तानी व समशेर यांना आपल्या लोकनेत्याचे जीवनात इतके महत्वपूर्ण स्थान



असावे असे तत्कालीन जनसमूहाला मंजूर नव्हते. त्यातून बाजीरावाचे एकाकित्व व तशाच भावस्थितीतला मृत्यु ह्या भीषण गोष्टी घडल्या. एका भीषण व उत्कट अशा शोकांतिकेचा हा नाट्य विषय – 'दुसरा पेशवा' नाटकानंतर त्याच विषयावरील 'मी सूर्याची रोहिणी' हे पंडित गोविंदराम लिखित नाटक मुंबईच्या प्रसाद थिएटर्सचे वतीने मोठ्या थाटात रंगमंचावर आले आहे. वरील विषय मराठी रंगमंचाला नवा नाही. आणि तरीही हे नाटक अनेक बाबतीत तसे नवे आहे. प्रथम नाटकाचा विचार करतो. नंतर प्रयोगाचा!

प्रस्तुत नाटकातील सर्वात महत्वाचा भाग बाजीराव पत्नी काशीबाईच्या विषयीचा! ह्या नाटकातील 'काशीबाई' एक नवनिर्मिती आहे. आजवर बाजीराव-मस्तानी विषयक नाटकात-काशीबाई ही नेहमी एक 'उपेक्षिता' म्हणूनच रेखाटली गेली आहे. सारे कॅमेरे मस्तानीच्या नृत्यावर वा तिच्या बाजीरावांच्या प्रणयप्रसंगावर रोखलेले असायचे. प्रस्तुत नाटकात कॅमेरा काशीबाईला 'न्याय' देतो आणि काही चांगले 'क्लोजअप्स'ही टिपतो. बाजीरावाविरुद्ध चिमाजीसकट सारी माणसे उलटली असताना, त्याच्या भावभावना जाणून घेऊन आपली त्रुटि आणि मस्तानीचे मोठेपण जाणून घेऊन ती मनाची एक मोठी झेप घेते – अखेरपर्यंत त्या उंचीवर ती राहते हा विशेष! द्वेष, सवतीमत्सर ह्यांचा वारा तिला लागत नाही. बहिणीचे प्रेम ती मस्तानीला देते. 'काशीबाई'ची निर्मिती व तिच्या तोंडी घातले गेलेले उत्कट व भव्य भावनेचे संवाद हा ह्या नाटकातला चांगला भाग! ह्या नाटकातला चिमाजी अप्पा हा अकारणच खलनायक वाटतो. वस्तुतः तसा तो नाही. बाजीराव त्याला जे 'मोठे'पण देतो. त्या 'स्टेचर'वर चिमाजी कधीच जाताना दिसत नाही. त्याच्या मनाचे चांगुलपण, त्याची कुचंबणा-मनातले द्वंद्व–कर्तव्यकठोर होता नाही येणारी विकलता हे भावदर्शन चिमाजी बाबतच्या लिखाणात कमी पडले असल्याने चिमाजीचे चित्रण एकसुरी व खलनायकी ढंगाचं झाले आहे. दुसरे असे की, बाजीराव-मस्तानीची ही कथा असल्याने त्यांच्यातल्या 'प्रसंगांना' काही प्राधान्य मिळायला हवे होते. बाजीराव-मस्तानी भेटीचा प्रसंग (पहिल्या) पुरेसा उत्कट होत नाही (लेखनदृष्टया) त्यानंतरचा प्रसंग समशेरच्या वाढदिवसाचा. त्या प्रसंगातही बाजीराव-मस्तानी एकत्र नाहीत तर बरीच माणसे आहेत. मस्तानी आणि चिमाजी यांचा शेवटच्या अंकातील संघर्ष व मस्तानीचे निवेदन तिला खूप उंच नेऊन बसविते. मस्तानी ही महाराष्ट्राला समजलीच नाही आणि त्यामुळे तिची आणि बाजीरावांची पर्यायाने शोकान्तिका घडून आली. ह्या नाटकातला आणखी खटकलेला भाग असा की, छत्रसालाच्या दरबारात मस्तानीच्या स्वीकाराची सूचना करताना काशीबाईच्या क्षयीपणाचा उल्लेख करून जी 'सौदे'बाजीची भाषा केली आहे ती मस्तानी, बाजीराव, छत्रसाल व अब्बाजान ह्या साऱ्याच व्यक्तिरेखांना पर्यायाने अन्याय करून जाते. काशीबाई क्षयी असती वा नसती तरी मस्तानीने लहानपणापासून बाजीरावचे








'स्वप्न' पाहिले होते आणि म्हणून ती झेपावत त्याच्याकडे गेलीच असती. मस्तानी केवळ कंचनी नव्हती, तर ती धाडसी होती. आणि तिची प्रीती उत्कट होती, त्यामुळेच असला अतिसामान्य असा सौदेबाजीचा पर्याय या नाटकाची एकूण बैठकच सामान्य स्तरावर आणून ठेवतो. काशी क्षयी आहे हा उल्लेख निदान बाजीरावसमोर तरी व्हायला नको होता. तो झाल्यावरही, बाजीराव पत्नीनिष्ठ असूनही मस्तानीचा स्वीकार करतो ही गोष्ट त्याला खाली आणते. भटजी आणि हिरी यांचे (केवळ हलके फुलके वातावरण निर्माण करण्यासाठी) तोंडी घातलेले संवाद असाच विरस करतात. काशी-बाईसमोर हे चालू शकते? पेशवे वाड्यात? तिसऱ्या अंकातील बाजीरावच्या अत्यवस्थतेच्या उल्लेखानंतरचा त्यांचा प्रवेश उत्कट असूनही हास्यास्पद ठरतो. अत्यवस्थ बाजीराव ठणठणित उभा राहतो व चक्क वीस मिनिटे, दणदणित आवाजात भाषण ठोकतो. त्यामुळे त्याची वेदना प्रेक्षकांना अस्वस्थ करीत नाही. 'मी सूर्याची रोहिणी' हे थीम साँग चांगले आहे, पण प्लेबॅक चांगला नाही. एखाद्या अधिक चांगल्या गायिकेकडून ते म्हणून घेतले असते तर—

थोडे प्रयोगाबाबत—बाजीराव (मनोहर कर्वे), मस्तानी (नलिनी चोणकर), काशीबाई (सौ. विमल भातखंडे), आबाजान (कृष्णराव चोणकर), चिमाजी (पंढरीनाथ बेर्डे) ह्या महत्त्वाच्या भूमिका! चिमाजीची भूमिका बरीचशी एकसुरी करण्यात आणि ती खल नायकी स्तरावर नेण्याचं काम बेर्डे करतात. संवाद फेकण्याची त्यांची पद्धत चांगली असूनही वरील कारणांमुळे ते नाटकाला काहीसा अन्यायच करतात. मस्तानीची भूमिका नलिनी चोणकर समरसून करतात. काही ठिकाणी 'मेलो ड्रामा' आणतात, तेव्हा मात्र काहीसा विरस होतो. त्यांच्या ठिकाणी असलेल्या नृत्यकौशल्याचा नाट्याचे रंगतीचे दृष्टीने अधिक व अधिक कलापूर्ण उपयोग करणे शक्य असूनही त्याबाबत दक्षता कां घेतली गेली नाही हे समजू शकत नाही. बाजीरावच्या पहिल्या भेटीचे वेळी जे नृत्य त्या करतात ते धुंदीचे—बेहोषीचे, उत्कट आनंदाचे सूचन करण्यात कमी पडते. बाजीरावाच्या मृत्यूनंतर पुन्हा एकदा धुंदीने नाचून गाऊन आत्महत्या केली असती तर उचित ठरले नसते काय? स्वप्नाच्या—प्लेटॉनिक—स्तरावर नेऊन तो मृत्यू व ते आधीचे गीत-नर्तन एका वेगळ्या काव्यात्म शेवटाप्रत नेता आले असते. श्री. मनोहर कर्वे हे हौशी रंगभूमीवरील एक हौशी नट. उमदे व्यक्तित्व लाभलेला हा कलाकार. झेप मोठी होती. आव्हान मोठे होते. त्याला पुरे पडण्याचा कसोशीचा प्रयत्न ते करतात. व्यथा-वेदना पोहचविताना मात्र ते कमी पडतात. संवाद चांगले म्हणतात. भावदर्शन काहीसे उणे पडते. पहिल्या प्रवेशात, मस्तानी भेटीतल्या प्रसंगात ते ठीक वागतात-बोलतात. अधिक श्रमांची गरज आहे. कृष्णराव चोणकर हे गाण्यासाठीच आले आहेत ते काम ते चांगले वजावतात. सर्व गाणी झकास रंगतात. सौ. विमल भातखंडे यांची 'काशी' उत्कटतेने रंगते. भाषेवर, भाषेतल्या लयबद्धतेवर, नादा-तालावर ह्या बाईंचे प्रभुत्व आहे. फक्त [illegible] कमी वाटल्या-जाणवल्या नाहीत (तसे संवाद म्हणत असताही) भास्कर गोडसे यांचा भटजी 'अति उत्साही' वाटला. प्रेक्षकांशी वारंवार बोलण्याची त्यांची संवय रसभंग करीत होती. बालनट अनंत गद्रे याचे काम ठीक वाटते. बाकीची कामे बरी म्हणायची. होळकर पटत नव्हता. दत्ता चोडणकर हे खरं तर गुणी नेपथ्यकार. परंतु प्रस्तुत नाटकात त्यांनी 'निराशा' केली येवढेच लिहितो. वस्तुतः मुंबईचा प्रयोग हा काही पहिला प्रयोग नव्हता. मग असे कां? संगीताबाबत खास म्हणता येण्यासारखे नाही. 'थीम साँग'ची चाल बरी होती. दिग्दर्शन घोपटमार्गी होते (मामा डोंगरे) विशेषतः छत्रसालाचा दरबार आणि शेवटचा संपूर्ण अंक हे मोठे आव्हान! तिथे मर्यादा जाणवतात. बाजीरावाची ही शोकांतिका अस्वस्थ करून जात नाही हे मात्र खरे! पंडित गोविन्दराम म्हणजे गोविन्दस्वामी आफळे येवढेच शेवटी लिहितो. त्यांची काही नाटके रंगमंचावर आली आहेत. हा एक उजवा पण अपूर्ण प्रयत्न!

## राजा नावाचा गुलाम

नाट्यविजय ह्या संस्थेतर्फे श्याम फडके लिखित 'राजा नावाचा गुलाम' हा फार्स व्यावसायिक रंगमंचावर नुकताच सादर करण्यात आला. ह्या फार्सचा पहिला प्रयोग 'महाराष्ट्रीय कलोपासक'ने ३०–७–६७ ला पुणे येथे केला होता. फार्समध्ये तसे ठरीव कथानक कुणी अपेक्षीत नाही. चार घटका करमणुक हा हेतु असतो. स्थूलपणे, माणसांच्या 'टाइप्स'मधून एक कथा आकार घेते. त्या माणसांच्या 'टाइप्स'मधूनच गुतागुंत (व गंमत) वाढत जाते व अखेर त्या गुंतागुंतीची जी उकल होते ती हास्यनिर्मिती करून जाते. राजा साने ह्या तरुण, अविवाहित कारकुनाच्या प्रशस्त ब्लॉकमध्ये [ कारकुनाच्या माफक पगारवाढीच्या स्वप्नांच्या पार्श्वभूमीवर हा ब्लॉक जरा नजरेत (वेगळ्या अर्थाने) भरतो. ] हा सारा फार्स घडतो. राजाशी घनिष्ट, नावापुरता वा काहीही संबंध नसलेली अनेकविध 'नमुनेदार' माणसे येतात. धुडगुस घालतात आणि शेवटी 'राजा'ला

(पृष्ठ ६२ वर पहा)





अनुक्रमणिका



## दोन अध्यक्षीय भाषणे–

सध्या कवींना बराच भाव आलेला दिसतो आहे. कवि हा चेष्टेचा, उपहासाचा, टिंगलीचा वा नकलेचा विषय आहे असे मानण्याचा काळ मागे पडून कवि हा मानाचा (मानधनाचाही) विषय झालेला आहेसे दिसते आहे. साहित्यप्रांती कवींचा भाव वधारला आहे. आता कविता छापताना उपकाराची भावना दिसत नाही, मानधन देऊन काहीशी योग्य संभावना करण्याइतपतच दृष्टिकोनात फरक पडलेला नाही, तर साहित्य संमेलन, वाङ्मय-परिषद व नाट्य संमेलनाचे अध्यक्षपदही त्यांच्यापर्यंत चालत येऊ लागले आहेसे दिसून येते. हा भाग्ययोग अलिकडेच तीन कवींच्या बाबत घडून आला. त्यावरूनच तर मला ही कल्पना सुचली. वर्धेस प्राचार्य पु. शि. रेगे अध्यक्ष होते, तर परवा वडोद्याला कवि-नाटककार-पत्रकार विद्याधर गोखले अध्यक्ष होते. ग्वाल्हेरला नाट्य संमेलनवाल्यानी कवि ग. दि. माडगूळकर यांना अध्यक्षपद दिले. पैकी वर्ध्याच्या संमेलनाबद्दल व अध्यक्षीय भाषणाबद्दल गेल्या अंकी लिहिले. विद्याधर गोखले हे आज नाटककार म्हणून प्रामुख्याने कीर्त पावले असले तरी गोखले हा शेरशायरीत रमणारा काव्यात्म वृत्तीचा मनुष्य आहे हे साऱ्याना ठाऊक आहे. परंतु माडगूळकर अण्णांचे भाषण वाचल्यानंतर माझ्या मनात एक विचार आला तो लिहून टाकतो. माडगूळकर यांना ग्वाल्हेर ऐवजी वडोद्याला पाठवायला हवे होते. वडोद्याला होती वाङ्मय परिषद आणि ग्वाल्हेरला होते नाट्य-संमेलन! रौप्य महोत्सवी नाट्यसंमेलन! तिथे गोखले नाटककार, नाट्यचिंतक व नाट्याभ्यासी म्हणून चांगले शोभून दिसले असते. आणि त्यांनी रौप्यमहोत्सवी नाट्य-संमेलनाला साजेसे ढंगदार व परखड भाषण केले असते. ही आपली कल्पना. प्रत्यक्षात घडले वेगळे. आणि जे घडले ते स्वीकारूनच त्या दोन भाषणांचे अनुषंगाने लिहितो.

श्री. विद्याधर गोखले यांनी वाङ्मय-परिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणात काही वाङ्मयीन प्रकृति-विकृतींचा मागोवा घेण्याऐवजी, काही मौलिक असे वाङ्मयीन नवे चिंतन मांडण्याऐवजी स्वराज्यातील शासन-साहित्यिक संबंधाबाबत बरेचसे परखड विवेचन केले आहे. त्या सर्व विवेचनातल्या एका भागाबद्दल मी त्यांचे प्रथम अभिनंदन करतो. "विद्वान भाड्याने (वा विकत) घेणे आहे" ह्या शासकीय फलकावर 'लक्ष' ठेवून सतत त्या अनुषंगाने आपले 'प्यादे' सरकारी 'कृपाशील' डोळ्यात कसे भरेल ह्याची चिंता वहात आपल्या साऱ्या (बऱ्या वाईट) हालचाली करण्याच्या प्रवृत्तीवर त्यांनी जो कठोर प्रहार केला आहे तो मला रोखठोकपणामुळे आवडला. प्रज्ञा ही स्वराज्यात सन्मानली गेली पाहिजे. पण त्यासाठी प्रज्ञेने सचिवालयाचे उंबरठे झिजविण्याची गरज नाही असे गोखले यांजप्रमाणेच मलाही वाटते. साहित्य, कला क्रीडा, नाट्य-संगीतादि कलांना संस्थानी काळात राजाश्रय होता प्रोत्साहन होते. बहर येत होता. बहर जोपासला जात होता पण तो आश्रय दिला जात असतानाही काही 'डिग्निटी' होती. मान-सन्मान दिला जात होता. क्रीडा-कला प्रगत होत असत–स्वतंत्रपणे बहरत–सरकारी कृपा–प्रसादाकडे लक्ष ठेवून त्यांचे विकसन होत नसे. शासनाचे लक्ष असे सरकारी कृपा पाहून सी. के. नायडू बाऊंडरीज् मारत नसे. गंधर्व चार ताना जास्त घेत नसत. अशी अनेक उदाहरणे दता येतील. (संस्थानी अनुभव) पण गोखले यांनी मांडलेल्या ह्या विचाराशी मी सहमत आहे. कलावंत कलेच्या विकसनासाठी कलेचा मानसन्मान (उंची व खोलीही) वाढविण्यासाठीच जवळ केले जात. ते बाळगले जात असताना त्यांना कुठेही 'हुजरे' म्हणून वापरण्याचा हेतु नसे. आपल्या रसिकेतेची ती बिरुदे म्हणून मिरवण्याचा हेतु असेलही. पण त्यामुळे त्या संस्थानिकांनी कला-क्रीडेच्या क्षेत्रात, त्यातल्या 'तात्विक' बाबतीत कधी ढवळाढवळ केली नाही. "शासकीय विषयांवर नाटक, कादंबरी, काव्ये लिहा" असे 'अ-कलात्मक' निर्बंध घातले नाहीत. क्लब 'यशवंत' असला आणि राज्य यशवंतरावं होळकरांचे असले तरीही 'यशवंत क्लब'-मधला राजा होता सी. के. नायडूच ! गोखले यांचे हे मत संस्थानी अनुभवातून गेलेल्या माणसाना पटेल. त्या पार्श्वभूमीवर स्वराज्यातल्या साहित्यिकांकडे उपयुक्तता-वादाचे दृष्टिकोनातून पाहण्याची जी वृत्ती आहे तीबद्दलची गोखलेकृत मीमांसा मला पटते. साहित्यिकाचे साहित्यिक म्हणून जे स्वतंत्र, स्वयंभू व श्रेष्ठ असे स्थान आहे. त्याबाबतची व्यापक व योग्य अशी भूमिका शासनाने घेतलेली आहे असे गोखल्यांना जाणवत नाही. "साहित्य-संस्कृतीचे राष्ट्र निर्मितीतील सर्वोच्च महत्त्वच सरकारला मनापासून पटलेले दिसत नाही" हा विचार सांगताना गोखले एक शेर सुनावतात

> अंधेर हैं वहाँ, जहाँ आदित्य नहीं हैं ।
> मुर्दा है वो देश जहाँ साहित्य नहीं है ।

लोकशाहीतल्या 'सरकारी' धोरणापुढे "पैसा, पदवी व प्रतिष्ठा यांच्यासाठी सत्ताधीशांचे उंबरठे झिजविणाऱ्या बुद्धिजीवी कंगालांचे, खुर्चीवादी विद्वानांचे; साहित्यिक भुके-कंगालांचे पीक फोफावू लागले आहे" असे गोखले म्हणतात. 'लाचार बुद्धिजीवी लोकांचे हुजुरातींचे पथक' म्हणूनही गोखले त्यांची कडक शब्दात संभावना करताना दिसतात. साहित्यिकांप्रमाणेच पत्रकारही विकत (वा भाड्याने) घेतले जात आहेत त्यामुळे "मिंधेपणाच्या बाळवीने" ह्या

आधारस्तंभही पोखरला जात आहे अशी व्यथा गोखले कळवळून व्यक्त करतात. ह्या शासकीय दडपणाबरोबरच वाढत चाललेल्या चळवळचांच्या व जनतेच्या दडपणाचाही ते मुखभंग करताना दिसतात. गेले काही दिवस शिवाजी-रामदास-साहित्यातील ब्राम्हणशाही–हिंदू धर्म-चातुर्वर्ण्य-चित्पावन–पेशवे आदि अनेकविध विषयांवर जी व जशा पद्धतीनें चिखलफेक चालू आहे ती पाहिली की गोखल्यांची ही परखड वाणी पटू लाकते. हे संकट माझ्या दृष्टीने गंभीर आहे. कारण त्यात काही वाङमयीन वा कलात्मक आव्हान व आवाहन नसते, तर तेथें लोकसमूहाची क्षुद्र हुल्लडबाजी वा टोप्या उडविणे असते. त्यातून साहित्यिक निमिती करणारांच्या मनात एक कायमचा भयगंड निर्माण होण्याची भीती संभवते म्हणून मी तिला अधिक गंभीर वाव म्हणतो. महाराष्ट्र राज्य संस्कृति मंडळादि सरकारी कृपेने निघालेल्या संस्थांच्या कार्याबद्दलही गोखले यांनी काही परखड प्रश्न विचारले आहेत. शासनाने ह्या कार्याचे पुनर्मूल्यमापन करण्याची गरज आहे. वर्षासने व पेशवाई रमण्यातल्या 'दक्षिणा' वाटायलाही हरकत नाही. पण प्रत्यक्षात काही घडते की नाही हे पाहणेंही 'जागृत' लोकशाहीत आवश्यक नाही काय ? एक गोष्ट आठवते. न्या. छागला शिक्षण मंत्री झाले तेव्हा त्यांनी प्रथम पायलीच्या पन्नास समित्या नाहीशा केल्या होत्या. जनतेचा हा पैसा असल्याने शासनाने हे 'रमणे' पारखून घेतले पाहिजेत असेच कुणीही अपेक्षील. "महाराष्ट्र राज्य संस्कृति मंडळ" वा तत्सम चळवळ अधिक लोकप्रिय व कार्यक्षम होण्याचे दृष्टीने गोखले ह्यानी काही सूचना केल्या आहेत, त्या विचारणीय आहेत. विशेषतः सरकारी पारितोषिकांबाबतची सूचना मला अधिक महत्त्वाची वाटते. प्रादेशिक खुषीकरणाचा कलाबाह्य निकष जेव्हा लावला जातो तेव्हा तर मूळ कल्पनाच कोलमडून पडते असे मलाही वाटते. चित्रपट, नाटके, पुस्तके इत्यादि बाबत "सरकार साहय 'सापेक्ष" वृत्तीने 'गणिते' मांडून निमिती करण्याच्या गंडातून वैयक्तिक हिमतीवर ध्येयवादी धाडसे करण्याची उन्मेषशाली जिद्द मरत चालली आहे" हा परखड इशारा मला फार मौलिक वाटतो. अखेर साहित्यनिर्मिती ही जर स्वतंत्र व स्वयंप्रज्ञेची प्रक्रिया असेल तर ही सारी कलाबाह्य प्रलोभने तिच्या मार्गातली धोंड म्हणून पुढे येता कामा नयेत असेच कुणीही अपेक्षील. कलेच्या पारितोषिकांना कलेचेच निकष लावले पाहिजेत. जात, प्रांत, जिल्हे, समाजवादी प्रचार, 'अधिक धान्य पिकवा' वा सरकारी 'त्रिकोण' असले संपूर्णतया कलाबाह्य निकष, त्यात नसावेत अशी रास्त भूमिका कलाकार साहित्यिकांनी घेतली पाहिजे. गोखले ह्यांनी लौकिक व व्यवहाराची भूमिका घेऊन काही सनातन विचार सूचित केले आहेत म्हणून त्यांचे अभिनंदन करतो. विषय तसा 'नाजुक' होता पण दुखणे अवघड जागी असले तरी एकूण सारे शरीर (व जीवन) जगविण्यासाठी शस्त्रक्रिया जर आवश्यक असली तर 'नाजुक' कामेंही कठोर मनाने करावी लागतात. गोखले यांनी हे काम हिमतीने केले आहे त्याबद्दल ते निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत.

ह्या पार्श्वभूमीवर ग्वाल्हेरला माडगूळकर यांनी केलेले भाषण केवळ 'निराशाजनक' आहे असे नाईलाजाने म्हणणे भाग आहे. माडगूळकर जणु एखाद्या शालेय वा महाविद्यालयीन स्नेहसंमेलनाचे अध्यक्ष होते वा एखाद्या सत्कार सभेतल्या सत्काराला प्रासंगिक (व जुजबी) उत्तर देत आहेत असे ते भाषण वाचून वाटले. भाषणाच्या वाचनानंतर एक गोष्ट मनाला सारखी जाणवत राहिली ती अशी की ज्या गादीवर आपण बसलो आहोत त्या गादीवर बसण्याचा आपल्याला 'नैतिक' (वा कसलाच) अधिकार नाही अशा गंडाने (कॉम्प्लेक्स) माडगूळकरांची साथ सोडली नव्हती – नसावी. त्या भाषणात त्यांनी तशी कबुली दिली आहे. (नसती दिली तरी पुढील भाषणात ती मिळतेच) नाटकाच्या बाबतीत काही तांत्रिक वा मूलगामी चिंतन त्यात नाही. नट, नाटके, नाटकाच्या व्यावसायिक यशापयशाचे शिल्पकार (वा भविष्यवेत्ते) असे दलाल, नाइटस्च्या पद्धतीमुळे व्यवसाय व कलात्मकता यावर होणारे काही अनिष्ट परिणाम – सुविहीत प्रयोगांवर होणारे परिणाम, नाइटस्चे दर वाढवून घेण्यासाठी कलाकारांकडून होणारे अडवणुकीचे प्रकार, त्यातून निर्माण होणारी व अंती धंद्याला व कलेलाही मारक ठरणारी स्पर्धा, कलाकारांतले बेबनाव, चांगली नाटके मिळत नाहीत ही निर्मात्यांची व्यथा, प्रायोगिक रंगभूमीवरील 'प्रयोग', त्यात वाढत जात असलेले तंत्राचे आक्रमण, नाटच स्पर्धांतून उदय पावणाऱ्या कलाकारांना

व्यावसायिक (वा व्यापक) रंगमंचावर प्रवेश उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने आखावयाच्या योजना, संगीत परंपरेला टिकवून धरतील, उज्ज्वल करतील अशा नवनवीन कलाकारांची उणीव, व्यावसायिक कंपन्यांचे अभावी केवळ त्यावरच पोट अवलंबून असणाऱ्या कलाकारांची होणारी कुतरओढ, ह्या वा ह्यासारख्या कुठल्याच प्रश्नावर ह्या भाषणात आपल्याला उत्तर मिळत नाही. मराठी रंगभूमीच्या सुवर्णयुगाचे नुसते दाखले देऊन वा त्याबद्दल खूपसे श्रद्धापूर्ण विवेचन करून आजच्या रंगभूमीच्या व्यवहारात काही क्रांतिकारक बदल घडवून आणता येत नाहीत. रंगभूमी ही काही मानवी व्यवहारापासून वेगळी काढता येण्यासारखी 'स्वतंत्र' बाब नाही. सुवर्णयुगातले भारतीय-मराठी भावजीवन व आजचे भावजीवन ह्यात खूप अंतर पडले आहे. म्हणूनच नुसती भलावण चालणार नाही. आजच्या जीवनाच्या संदर्भात रंगभूमीला काय करता येण्यासारखे आहे, काय केले गेले आहे, त्यातल्या उणीवा काय आहेत. त्यातले चांगले काय आहे. जे परकी आले आहे व येते आहे त्यातल्या भारतीय शक्यतांचा (पॉसिबिलिटीज्) विचार करणे कसे शक्य आहे वगैरेबाबत कसलेही विवेचन यात नाही. अत्यंत स्थूल, ढोबळ व उथळ अशी विधाने आहेत. तीही केवळ विधानेच आहेत. मागे काही अभ्यास वा चिंतन नाही. घरातून पळून जाऊन नाटक कंपनीत राहणारे व पडतील ती कामे करून जीवन कंठणारे बव्हंशी अशिक्षित नट आणि आजचा सुजाण व सुशिक्षित, नाट्याभ्यासी नट व त्याभोवतीचे अन्य सुशिक्षित साथीदार ह्यांच्या तुलनेतून काही प्रश्न उभे राहतात. आणि काही नवी आव्हानेही मिळतात. माडगूळकर यांनी यापैकी कुठल्याच प्रश्नाचा वा आव्हानाचा मागोवा घेतलेला नाही. जुने ते सर्व 'सोने'च होते आणि नवे ते सारे 'हीण'च आहे असे म्हणणे निदान आज तरी फारच भाबडेपणाचे ठरेल. कलेच्या संदर्भात 'लौकिक यश' आणि "चांगली कलाकृती" ह्यांचे प्रमाण नेहमी 'सम'च असते असे म्हणणे वा मानणे हेही तेवढे खरे नाही. जुने नट, नाटके, नाटक-कंपन्या आणि आजचे नवयुग, ह्यांचे स्वरूप सारखे आहे का हे तरी पाहिले पाहिजे असे माडगूळकर म्हणतात. याठिकाणी त्यांना सुवर्णयुगातील 'लौकिक यश'च अभिप्रेत नसावे असे मी गृहित धरतो. सुवर्णयुगाचा उल्लेख करताना माडगूळकर सौभद्र–स्वयंवर–शारदा ह्या नाटकांचाच उल्लेख करतात. तशी उल्लेखता येतील अशी काही पौराणिक, ऐतिहासिक, कल्पनारम्य, सामाजिक नाटके, काही उपहासगर्भ नाटके, काही चांगले अनुवाद–रूपांतरे मराठी रंगमंचावर आली आहेत. पुन्हा येथे 'धंद्या'चे गणित मांडून चालणार नाही. पण प्रयोग म्हणून त्यानी मराठी नाटकाला काही नवे दिले आहे असे म्हणता येईल. सरकारी स्पर्धांतूनही काही चांगली नाटके, नाटककार, दिग्दर्शक, तंत्रज्ञ, आणि नेपथ्यकार दिले आहेत. रंगभूमीविषयक जिद्द वाढविली आहे. आचार्य अत्रे, पु. भा. भावे, वसंत कानेटकर, विद्याधर गोखले, विजय तेंडुलकर, मधुकर तोरडमल, चि. त्र्यं. खानोलकर, गो. गं. पारखी, रणजित देसाई, बाळ कोल्हटकर, श्याम फडके, बबन प्रभु–यादी वाढवता येईलही. वाढवीत नाही. नाटक ही कला आहे, आणि 'लहरी' कला आहे. पण प्रयत्न आणि प्रयोगातून कधीतरी नाटकाच्या गणिताचे अचुक उत्तर मिळून जाते. ही नावे काही प्रयत्न–प्रयोगशीलांची आहेत. आजच्या कलाकारांची नावेही देता येतील. त्यांना दाते-फाटक-कोल्हटकर-पेंडसे आदींची प्रशस्तीपत्रेही लाभलेली आहेत. पण जुने ते आणि तेवढेच सोने ही भूमिका सोडली पाहिजे. सुवर्णयुगातही तीन चारच नावे माडगूळकरांना सुचतात. इथे तेवढी वाण खचितच नाही. संगीतप्रधान नाटकांची निर्मितीही चालू आहे तिचा प्रेक्षकवर्ग तयार होताच. तो त्यात रमतोही आहे. 'पंडितराज'पासून 'कटचार'पर्यंत आणि 'सुवर्णतुले'-पासून 'लेकुरे उदंड जाली' पर्यंत वेगवेगळ्या संगीताला आजचा प्रेक्षक दाद देतो आहे. 'मानापमान'ची आठवण मंदारमाला मत्स्यगंधा, ययाति-देवयानी, धन्य ते गायनी कळा, वैजू ही नाटके कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत आहेत. ही सारी नाटके 'स्वतंत्र' आहेत ! 'भारतीय' आहेत. धंद्याचे गणित कदाचित व्यस्तही असेल पण मत्स्यगंधा, ययाति-देवयानी, मंदारमाला, सुवर्णतुला, अश्रूंची झाली फुले, रायगडाला जेव्हा जाग येते, हा खेळ सावल्यांचा, एक शून्य बाजीराव, होनाजी-बाळा, पंडितराज जगन्नाथ, तो मी नव्हेच, मी जिंकलो मी हरलो, सगेसोयरे, सती, काळे बेट, लालबत्ती, नयन तुझे जादुगार, अबोल झाली सतार, कटयार काळजात घुसली, ससा आणि कासव, अशा काही नाटकांचा चांगली नाटके, नवे प्रयोग, समर्थ प्रयोग म्हणून नक्कीच उल्लेख करता येईल. भावे यांच्या 'विषकन्ये'चा आवर्जून उल्लेख करता येईल. पेंडशांच्या गारंबीचा बापू, संभूसाच्या चाळीत या नाटकानी तर नाटक आणि धंद्याचे गणितही सम असू शकते हे सिद्ध केले आहे. पण माडगूळकर यांनी आपल्या भाषणाचा 'ढोबळ' साचा बनविल्याने व 'जुने ते सोने (व) [illegible]' असे स्थूल तत्त्व स्वीकारल्याने हा गोंधळ उडाला आहे. एकांकिकांचे क्षेत्रही समृद्ध होत आहे. हे तर सारे नवे प्रयोग आहेत. आणि ही प्रयोगक्षमता आजच्या नाटककारांना सोडून गेलेली नाही असेही दिसते. प्रयोगातूनच 'नस' गवसते. पायऱ्या चढूनच देव गवसतो. ह्या प्रयोगातून जे घडते आहे त्याची अधिक डोळस चिकित्सा (व चिरफाडही) माडगूळकर यांनी केली असती तर ते अधिक बरे झाले असते. पण माडगूळकरांना सवड झाली नाही असं तेच म्हणतात. वास्तविक ह्या रौप्यमहोत्सवी संमेलनाचा मान चालत आलेला असताना माडगूळकरांनी ज्या पळवाटा (एक्स्क्यूझेस) मांडल्या आहेत त्या निदान त्यांच्या व्यक्तित्वाला शोभादायक नाहीत येवढेच लिहितो. माडगूळकरांचे सारे भाषणच एका मोठ्या न्यूनगंडाने पछाडलेले गेलेले आहे असे स्पष्ट दिसते. माडगूळकरांच्या भाषणात भाषेचा डौल, काव्यात्मता, तत्त्वचिंतन असते तसेही ह्या भाषणात कां बरे जाणवू नये ? घाई झाली हेच खरे असावे.

**– सारस्वत**



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



## ‘कोकणी’चा लेखनासाठी उपयोग कुणी केला ?

काही वर्षांपूर्वी मराठी साहित्य संघाच्या कै. वा. म. जोशी स्मारक व्याख्यानमालेत ‘भाषाशास्त्र’ या विषयावर डॉ. कालेलकर यांची तीन व्याख्याने झाली होती. त्यात आणखी काही भर घालून डॉ. कालेलकर यांनी ‘भाषा आणि संस्कृती’ हा ग्रंथ पुरा केला आहे. ग्रंथ हातात घेतल्यावर प्रथमच जाणवते ते त्याचे प्रसन्न व सुटसुटीत स्वरुप. तशीच ग्रंथाची आतील रचना पण सुबोध, सुललित व स्पष्ट अशी आहे. प्रा. न. र. फाटक यांचा या ग्रंथाला ‘पुरस्कार’ मिळाला आहे आणि स्वतः लेखकाचे ‘प्रास्ताविक’ही आरंभी जोडण्यात आले आहे.

पहिल्याच प्रकरणात डॉ. कालेलकर यांनी आपली भूमिका स्पष्ट केली आहे. भाषाशास्त्राचा विचार ते ‘समाज व भाषा’ अशा दोन दृष्टिकोनातून करतात. म्हणूनच त्यांच्या भाषिक विवेचनाला समाजशास्त्रीय व सामाजिक विवेचनाला भाषिक स्वरुप प्राप्त झाले आहे.

व्याकरणाकडे पाहण्याचा ग्रंथकारांचा दृष्टिकोन बराचसा परंपरागत दृष्टिकोनाला समूळ उपटून टाकणारा व धक्के देणारा असा आहे. ते म्हणतात, “आपणाकडे रूढ असणाऱ्या ‘व्याकरण’ या शब्दाचा अर्थ ‘लिहिण्याच्या भाषेचे नियम’ असा करायला हवा. ‘शुद्ध कसे बोलावे’ हा विषय या व्याकरणाच्या कक्षेत येऊ शकत नाही.

‘भाषा आणि साहित्य’ याबाबत उहापोह करताना भाषेची दोन स्वरूपे ‘लौकिक भाषा’ व ‘तांत्रिक भाषा’ अशी ग्रंथकारांकडून कल्पिली जातात. त्यापैकी ‘लौकिक भाषा’ ही सर्वांच्या सामान्य गरजा, सामान्य घडामोडी, सामान्य परिचित वस्तू, सामान्य भावना इत्यादि गोष्टींना मूर्तस्वरूप देणारी भाषा; ‘तांत्रिक भाषा’ ही मर्यादित वर्गाची विशिष्ट भाषा ठरते.

‘भाषा, बोली आणि समाज’ या लेखात ‘एका विशिष्ट सामाजिक संस्थेतील एका विशिष्ट रूढीचा विचार करून’ डॉ. कालेलकर यानी ‘मराठी भाषेच्या लेखनाचे स्वरूप कसे असावे’ याची तात्त्विक चर्चा केली आहे.

‘मराठीच्या बोली’ या लेखात मराठी प्रदेशातील विविध बोलींचा मराठी भाषेच्या संबंधात व्यापक विचार केला आहे. मराठी बोलीबाबतचे ग्रिअर्सनचे सिद्धांत विवेचनाला घेऊन डॉ. कालेलकर काही बोलीबाबत ग्रिअर्सनच्या मताशी असहमत होतात. पण कोकणीसंबंधी ‘लिंग्विस्टिक सर्वे ऑफ इंडिया’च्या सातव्या भागातील विधान त्यांना महत्त्वाचे वाटते. त्या विधानाचा मतितार्थ असा...‘भौगोलिक दृष्टीने ज्याला आपण कोकण हे नाव देतो त्या केरळच्या उत्तरेकडील समुद्रपट्टीत असलेल्या सर्वच बोली मराठीपासून एकाच विशिष्ट रीतीने वेगळ्या नाहीत; मराठीशी निश्चित निगडित अशा उत्तरेकडच्या बोली, वैशिष्ट्यपूर्ण रीतीने वेगळ्या अशा दक्षिणेकडच्या बोली, आणि या दोहोंना सांधणाऱ्या मधल्या म्हणजे मध्यकोकण किंवा दक्षिण रत्नागिरीकडील संक्रमक बोली, असा एक क्रम कोकणी या नावाने ओळखल्या जाणाऱ्या भाषासमूहात आहे.’ ‘लोकभाषा’ या नव्या शब्दाचा परामर्शही कालेलकर घेतात व मराठी भाषेचा अभ्यास इ. स. १७८६ पासून तो आजवर निरनिराळ्या परदेशी पंडितांनी कसा केला याचे समग्र दर्शनही करून देतात. नंतर काही बोलींचे नमुने देऊन त्यांचे मराठी भाषांतरही त्यांनी तुलनात्मक अभ्यासासाठी दिले आहे. इ. स. १८८९ ते १९४१ च्या दरम्यान कोकणी भाषेतील मासिके, पाक्षिके, साप्ताहिके, दैनिके पन्नासावर होती, त्यांचा दाखला देऊन कालेलकर दाखवितात की कोकणीचा लेखनासाठी उपयोग मुख्यतः ख्रिस्ती लोकांनी केला. गोव्यातील हिंदूंनी मुख्यतः मराठीचाच उपयोग केला. भाषाशास्त्रज्ञाच्या दृष्टीने कोणतीही बोली उच्च किंवा नीच नाही. भाषिक वस्तुस्थिती आहे तशी समजून घेणे आणि रेखाटणे हे त्याचे काम आहे.

डॉ. कालेलकरांच्या ‘भाषा आणि संस्कृती’ ग्रंथातील ‘मराठीचे लेखन’ या प्रकरणाचा उल्लेख मी शेवटी करीत आहे. लेखनाचे नियम ठरविण्याचे काम सोपे होण्यासाठी मराठीच्या मुख्य प्रांतिक बोलींचा अभ्यास होऊन ध्वनी व व्याकरण यांच्या दृष्टीने वेगवेगळ्या भागात बोलल्या जाणाऱ्या बोलींचे स्वरूप परिचित होणे ग्रंथकारांना इष्ट वाटते. दरम्यान जितकी सुधारणा करणे शक्य तितकी करणे पुढील पिढीच्या फायद्याचे ठरणार आहे, असे त्यांचे ठाम मत आहे. त्या दृष्टीने डॉ. कालेलकरांनी लेखनाचे काही नवे नियम पण सुचविले आहेत. ते सर्वांशी ग्राह्य म्हणता आले नाहीत तरी अंशतः निश्चितार्थाने ग्राह्य ठरावेत.

विद्यमान व भावी पिढीला भाषा संस्कृतीची वा वाटचालीची योग्य दिशा दाखविणारा हा ग्रंथ मराठी भाषेचा या व पुढील कित्येक दशकांचा आधारस्तंभ ठरावा. शास्त्रीय सत्याचा ऊहापोह करता करता डॉ. कालेलकरांनी लेखनशैलीचा पण एक मनोज्ञ आविष्कार साधला आहे, हे येथे नमूद करणे महत्त्वाचे ठरेल.

**—प्र. श्री. नेरुरकर**

(‘भाषा आणि संस्कृती’ : डॉ. ना. गो. कालेलकर : मौज प्रकाशन गृह, मुंबई ४ (किंमत रु. ७-५०).

## विनोदाचे दालन खुलविणारा सुरुंग

श्री. शां. शं. रेगे यांचा 'सुरुंग' हा दुसरा कथा-संग्रह. या संग्रहात एकंदर बारा विनोदी कथांचा समावेश आहे. श्री. रेगे हे लिहिणे जाणतात व जगतात.

त्यांच्या विनोदात तसे पाहिले तर असे [illegible]पून सांगता येईल इतके नवीन काहीच नाही : (माणसात तरी मूलत: नवीन असे कितीसे व केव्हा घडले आहे. त्याच्या स्वभावाच्या बाबतीत ?). माणूस हा विनोदी लेखकाला प्राचीन काळी जसा व जितका वाटला तितकाच आजही तसाच व तितकाच वाटणार. शां. शं. रेगे यांचा 'माणूस'सुद्धा या नियमाला अपवाद नाही. तो माणूस हौशी आहे; स्वत:ची मुलाखत देण्याची त्याला हौस आहे; तो मित्र कमवायला म्हणून जातो व त्यांनाच गमावून बसतो; 'कशासाठी' ? तर 'पोटासाठी ?' हे त्याचे जुनेच तत्त्वज्ञान आहे : 'हसावे व निरोगी व्हावे' कसे हे तो पुस्तकातून वाचतो व तसे प्रत्यक्ष आचरणात ([illegible]पणाने) आणतो व अंती हसायचेच सोडून देऊन मूळची आपली रोगट प्रकृती अधिकच रोगट करतो. तो कधी काळी एका संस्थानात 'तक्रार मंत्री'देखील बनतो व नंतर तक्रार 'खाते'च लोकांच्या तक्रारीमुळे बंद पडून 'मंत्रिपद' जाण्याची पाळी त्याच्यावर येते. त्याच्याही जीवनात 'रात्रंदिन युद्धाचे प्रसंग' आहेत; लहानपणापासूनच त्याला आपण कुणीतरी मोठ्ठं व्हावं असं वाटू लागतं व तो लेखक बनतो न बनतो तोच त्याचे सारे लेखन 'साभार परत' येऊ लागते. म्हणून तो स्वत:चे मासिक काढायचे ठरवून 'साभार परत'ची परतफेड करायचें निक्षून ठरवतो; त्याला कुणीतरी 'उत्कर्षाचा महामंत्र' देतो व तो आजचे काम उद्यावर टाकू लागतो. त्याची पोटदुखीची व्यथा फार जुनी आहे; अन्नाचे सर्व प्रकार कमीअधिक चवीने त्याने चाखलेलें असतात व त्याच्या 'अन्नप्रांता'तील ज्ञानसिद्धीमुळे खरेखुरे इतरांच्याच पोटात दुखू लागते. तो 'निद्रे'कडे 'एक तत्त्वचिंतन' या दृष्टीने पहातो व झोपी गेल्यावर तो जागा पण होतो : त्याच्या निद्रेमुळे तो स्वत:वर घोर प्रसंग ओढवून घेतो (बालपणापासून) व अखेरीला इच्छाशक्तीचा लोप होत होत त्याची निद्रा पण त्याला सोडून जाते व 'जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही' ही म्हण त्याच्या बाबतीत संपूर्ण खोटी ठरते.

असा हा शां. शं. रेगे यांचा माणूस पूर्वीही आपल्याला कोल्हटकरांच्या विनोदसृष्टीत भेटलेला आठवतो; गडकऱ्यांनी रंगविलेला माणूसदेखील 'तो हाच' हेही सारखे जाणवते; हा माणूस आपल्याला मराठीतील परंपरागत अशा साऱ्या विनोदविश्वात सारखा व त्याच सारखेपणाने वावरताना दिसतो. (मला वाटते भविष्य काळातही तो काही आणखी वेगळेपणाने वावरू शकणार नाही. तो जसा आज व काल आहे; तसाच तो उद्याही जसा तसाच राहणार, हे खचित !) श्री. रेगे यांच्या विनोद निर्मितीच्या क्लृप्त्या पण त्याच व तशाच पूर्वसूरींपासून ठाकठीक नेटकेपणाने उचललेल्या—कोटीबाजपणा, नर्म उपहास; व्यक्तिनिष्ठता; (दुष्टता मात्र नव्हे) व्यंजना व व्याजोक्ती. उदा. 'माझ्या पोटदुखीचा उल्लेख ते ज्या पोटतिडिकेने करतात त्यावरून खरे कुणाच्या पोटात दुखते ते सूज्ञास सांगणे नलगे' अशी व अशा तऱ्हेची वाक्यरचना व शैली कोल्हटकर, गडकरी, खांडेकर व केळकर यांच्या विनोदाचीच आठवण करून देते. (ज़मेला आणखी कॅप्टन लिमये व शामराव ओकही घ्यायला हरकत नाही).

असा हा स्फोटक नसणारा 'सुरुंग' 'आताशी मघाशी'नंतरचे श्री. रेगे यांचे 'पुढचे पाऊल' .पुन: पुन: मनात उपटणारे त्याचे निरामय अंग असे : विडंबनात तो रमतो; पण कुठेही विटंबने'चा स्पर्शही तो स्वत:ला होऊ देत नाही; तिखटपणा त्यात आहे; पण तो लवंगी मिर्चीचा नव्हे; असलाच तर तो बेळगावी मिर्चीचा (थोरल्या); तो चिमटे घेतो पण चावे कुठेच नसतात; त्याची बैठक सहृदयतेची आहे व म्हणूनच त्यात विनोदाची दारू ठासून भरली असताही आडवातिडवा किंवा ओबडधोबड स्फोट कुठेही न होता त्यातील 'माणूस' अबाधितच राहतो : त्याची रेवडी उडते हे खरे; पण त्याची चिंधडी चिंधडी होण्याचे मात्र टळते.

म्हणूनच श्री. रेगे यांचे हे पुस्तक मराठी वाङ्मयातील विनोदाचे दालन खुलवते. त्याला निरोगी माणुसकीचे व तात्त्विकतेचे अधिष्ठान प्राप्त करून देते. माणसातील विसंगती टिपताना जीवनातील सुसंगतीचा ते कुठेतरी छडा लावण्याचा प्रयत्न करते : असे निर्मळपणे आल्हादित करणारे स्मितहास्य फुलवित ठेवणारे व जीवनातील काही क्षण सुसह्य व संतुष्ट करणारे हे संग्राह्य पुस्तक. तशाच खेळकर व बोलक्या व्यंगचित्रांची मोजकी सायपण त्याला समर्थपणे लाभली आहे एक नमूद केलेच पाहिजे असे त्याचे अंग: शिवाय अंतर्बाह्य सुंदर छापलेले : A must !

—प्र. श्री. नेरुरकर

(सुरुंग लेखक—श्री. शां. शं. रेगे. सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे—२. मूल्य पांच रुपये).

---

(पृष्ठ ५ वरून—**आमचेही एक मत**)

सर्व पात्रे कोकणी माणसासारखीच वागतात नि वावरतात. श्री. पिंगे यांची भाषाही ओघवती आहे, त्यामुळे कादंबरी वाचताना कुठेही कंटाळवाणे होत नाही. श्री. पिंगे यांना धन्यवाद ! त्यांच्याकडून अशाच चांगल्या कथा-कादंबऱ्यांची अपेक्षा आहे.

आणखी एक गंमतीचा योगायोग आपल्याला कळविण्यासारखा आहे. श्री. ग. का. भडकमकर यांनी 'बासू हरला बासू जिंकला' या आपल्या कथेत रंगविलेल्या नायकासारखाच आमचा एक मित्र आहे (त्याचे आडनाव वेगळे असले तरी त्याचे नाव 'बासू'च आहे हा आणखी एक योगायोग) त्याच्याही जीवनात या कथेतल्यासारख्या काही घटना घडल्या आहेत. त्यालाही ही कथा दाखविली तेव्हा आश्चर्य नि गंमत वाटली.

आपले हे रजतमहोत्सवी वर्ष आपणांस सुखसमृद्धीचे व भरभराटीचे जावो !

नाशिक आपला

४–३–६९ **गोपाळ कृ. मोडक**



अनुक्रमणिका

[पान १० वरून– इंद्रधनुष्य]

एकंदरीत ही चित्रे 'अनाकलनीय' या सदरातच समाविष्ट करण्याचा मोह व्हावा. मात्र आजकालच्या पाश्चात्य कलेतील नव-नव्या प्रवाहांचा ज्याला परिचय आहे त्याला पटेल यांची स्फूर्तिस्थाने लक्षात येतील. एरवी भारतीय चित्रकलेच्या परंपरेशी एकदम फटकून वागणारी ही नवकला असल्यामुळे आपण गोंधळून जाणे साहजिकच आहे.

कृष्णाजी आरा यांनी आपल्या चिरपरिचित शैलीतील पुष्प-चित्रांचं प्रदर्शन जहांगीर आर्ट गॅलरीतच भरविलेले होते. सोबत अनावृत्त स्त्रीदेहाचे सौंदर्य टिपणारी काही चित्रे होती. मागे अशाच चित्रांचे प्रदर्शन आरा यांनी ताज आर्ट गॅलरीत भरविले असता, 'टाइम्स ऑफ इंडिया'चे समीक्षक श्री. निस्सीम इझीकेल यानी त्यांच्यावर हल्ला केलेला वाचकांना आठवत असेल. फार कठोर शब्दांत त्यानी आरांची संभावना करून 'विकृत मनोवृत्तीचे' म्हणून त्यांना निकालात काढले होते.

आरांच्या चित्रांत स्त्रीसौंदर्याचे दर्शन मोजक्या रंगात घड-विलेले असते. परंतु या चित्रांपैकी 'पूजा' हे चित्र आक्षेपार्ह वाटले. त्यात काही स्त्रिया (अर्थात् नग्नावस्थेतील) एका झाडाच्या बुंधा-खालील गणपतीच्या मूर्तीची पूजा करीत आहेत असे दाखविले होते. पिछाडीला एका भटजीचे डोकेही दिसत होते!

अशा प्रकारच्या चित्रात अनावृत्त स्त्रीदेहाला जर रोजच्या मानवी व्यवहारातील घडामोडीचा संदर्भ लाभला तर औचित्यभंग होतो असे मला वाटते. भारतीय मनाचा पिंडच असा आहे की अना-वृत्त स्त्रीदेहाच्या सान्निध्यात एखादा वस्त्रधारी पुरुष, गणपतीसारखे दैवत दाखविले गेले तर वास्तववाद आणि नग्नचित्रात अभिप्रेत असलेली काव्यात्मता यांचा भयानक संकर होईल.

या उलट फ्रेंच इंप्रेशनिस्ट चित्रकार माने यांचे 'हिरवळीवरील वनभोजन' हे चित्र घ्या. त्यात कपडे घातलेल्या दोन पुरुषांच्या जोडीला नग्न स्त्रिया आहेत. येथे औचित्यभंग होत नाही कारण पाश्चात्य मनाचा पिंडच वेगळा आहे. त्यात एक प्रकारचे 'सोफिस्टि-केशन' आहे, आणि त्या दृष्टिकोनातून पाहिले असताना मानेचे चित्र आक्षेपार्ह तर वाटत नाहीच, उलट त्यातील सर्व व्यक्तींच्या चेहऱ्यांवरील निरागस भावांमुळे ते काव्यात्म वाटते. (मानेने जेव्हा हे प्रदर्शनात प्रथम मांडले तेव्हा पॅरिसमध्ये खळबळ उडाली होती!)

पंडोल आर्ट गॅलरीमध्ये हुसेन यांचे सुपुत्र शमशाद हुसेन यांची चित्रे पाहायला मिळाली. आपल्या वडिलांच्या शैलीचा जाचक [illegible] आपल्यावर पडणार नाही याची या तरुण चित्रकाराने खूपच खबर-दारी घेतलेली दिसली. त्यांच्या आकृतीरचनेत नाविन्य आहे, रंग-लेपनात जोश आहे आणि एकंदर शैलीत तजेला आहे.

आपल्या वडिलांचे त्यानी केलेले एक व्यक्तिशिल्पही प्रदर्शनात मांडलेले होते. हुसेन यांच्या चेहऱ्याची वैशिष्ट्ये या शिल्पात नेमके-पणे साकार झालेली होती. शिल्पाचे डोळे एखाद्या प्राचीन प्रेषिताची आठवण करून देत.

शमशादचे भवितव्य उज्ज्वल आहे असा दाखला या त्याच्या पहिल्यावहिल्या प्रदर्शनाने दिला.

☆ ☆ ☆



(पृष्ठ ५५ वरून– रंगमंच)

एकटा (व एकाकी) टाकून निघून जातात. लग्नही नाही आणि (तसे) लफडेही नाही असा थपडा मारल्यासारखा चेहरा करून 'राजा' उरतो आणि पडदा खाली पडतो. ह्या फार्समध्ये मी वर म्हटल्याप्रमाणे माणसांचे अनेकविध 'नमुने' आहेत. स्त्रीविषयक 'जादा' कतुहल असलेला राजा, प्रेमात पडण्याचा ध्यास घेतलेली त्याची शेजारीण 'बेबी', त्याच्यावर आपले व आपल्यावर(च) त्याचे उत्कट प्रेम आहे असे मानणारी 'शशी; राजाचा मित्र [illegible] त्याचे 'म्हैस' फेम काका, राजाचे बॉस (क्लास वन् ऑफिसर) नाडकर्णी आणि कावळे बावळे सुधारणा मंडळाचे दोन सदस्य सौदा-मिनी कावळे आणि मेघराज बावळे (लग्न न करता भावा वहिणी-प्रमाणे राहतो म्हणे) येवढ्या माणसात हा फार्स घडतो आणि रंगतो. समाजातल्या काही 'फॅड्स'चे ह्यात विडंबन आहे, तसेच मानवी स्वभावातील उथळपणांचाही दंभस्फोट आहे. सामान्य माणसांचे स्वप्नरंजनही किती सामान्य असते आणि अतिसामान्य पूर्तीने (वा पूर्तीच्या कल्पनेनेही) तो कसा तुष्ट होतो ह्याचेही मर्मभेदक चित्रण ह्यात आहे. खिल्ली करीत करीतच अंजन घालणे फार्सला साधते. त्या अर्थाने कथानक नसते आणि असतेही. फार्स म्हणजे त्या अर्थाने 'निरर्थिका' नसतात. तसे मानणे चूक होय!

ह्या फार्समध्ये सर्वात मजा आणतात–कावळे (विनया बिवलकर) बावळे (दिलीप कोल्हटकर) नाडकर्णी (कमलाकर नाडकर्णी) बेबी (ज्योत्स्ना जोशी). त्यातल्यात्यात कमलाकर नाडकर्णी यांचा 'क्लास वन्' गुलाम 'ए वन्' ठरतो. कावळे-बावळे (बिवलकर-कोल्हटकर) तसे नवेच. पण 'नवखे' वाटत नाहीत. सीता (आशा पेडणेकर) दाते (जयंत जोशी) व वासू (चंद्रकान्त पवार) यांनी बरी कामे केली. शशी (शोभा पेंगणकर) ह्या त्यातल्या त्यात कमी पडल्या. दिग्दर्शक शरद सापळे यांनी राजा सानेची भूमिका केली. आवाजाची साथ कमी पडली. पण भूमिकेतले बारकावे त्यांनी चांगले दाखविले. दिग्दर्शक म्हणून सापळे यांची कामगिरी मात्र कौतुकास्पद होती असे म्हणता येईल. पांडुरंग कोठारे यांचे नेपथ्य वेधक व शोभेसे वाटले. (शंका सुरुवातीला व्यक्त केलेली आहेच. श्याम फडके यांचे संवाद चुरचुरीत व गतिशील आहेत. श्याम फडके यांना फार्सची नाडी गवसली आहे ह्याचा प्रत्यय हा फार्सही देऊन जातो.

— चित्रगुप्त

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment APRIL 1969

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.

अनुक्रमणिका